# आरसे

**-- चं.प्र.देशपांडे.**

आपल्याला अजिबातच माहीत नसलेल्या गोष्टीबद्दल आपण काहीच बोलू शकत नाही. आता समजा की, आपल्याला प्रकाश माहिती आहे, तर आपण अशी कल्पना करू शकतो की, या जगात प्रकाशच नसता तर ... म्हणजे कल्पना कशी ? तर प्रकाशाशी संबंधित. याच्याबाहेर आपण जाऊच शकत नाही. मग असं जर आहे तर मी म्हणतो की, हीच कल्पना करू या. पण पुढची कल्पना मी जरा वेडगळपणाची करणार आहे. ती म्हणजे अशी की, समजा, प्रकाश नसताच - नुसता अंधारच असता - तर आरशांना हे कळायला काय मार्ग होता की आपण आहोत म्हणून ? तुम्ही म्हणणार की, ' अहो, जगात प्रकाशच नसता तर आरशांचा प्रश्नच कुठे आला असता ? -- आरसा हा शब्दसुध्दा आपल्याला माहीत नसता, किंवा असता तर कुठल्यातरी संपूर्णपणे निराळ्याच अर्थानं माहीत असता.'

तर सांगतोय काय की, आपल्या कल्पनाशक्तीची भरारी - भरारी म्हटलं तरी ही एवढीच. प्रत्यक्षावर आधारलेलीच. तर यावरूनच आपल्याला आपल्यावरही उडी मारता येईल. म्हणजे असं की, आपण संबंधित असतो म्हणनच आपल्याला कळतं की आपण आहोत. हे म्हणजे थोडंसं प्रास्ताविक तत्त्वज्ञान झालं असं समजा. आता मी तुमच्यापुढे माझ्या अंतरंगातल्या कवडशांचं पोतं ओततो.

तुम्ही वाचक फसता फार लवकर. आता एका अर्थानं मी तुम्हाला धडधडीतपणे मूर्ख म्हणू शकतो. हे आतापर्यंतचं माझं सगळं तुम्हाला इतकं सहजी पटत कसं गेलं ? थांबा, पटलेलंच नाही असं म्हणायची घाई करू नका, कारण त्यात चांगलंच तथ्य आहे ; पण त्याचबरोबर दुसरी एक गोष्ट जी मी सांगायला पाहिजे होती ती सांगितली नाही. तिचं काय ? जाऊ दे. आता सांगतो. कल्पना, आहे त्याच्या संदर्भातच आपली भरारी घेऊ शकते हे तर खरंच, पण प्रत्यक्ष सत्य म्हणून अस्तित्वात नसलेल्या गोष्टी ती पाहू शकते हे कसं नाकारणार ? हे जर तुम्ही कळून सवरून किंवा कळत नकळत कसंही नाकारलंत तरी तुम्ही संपलातच मग. असं ऊन्ह पडलं तर माझा कवडसा कसा असेल ? -- लाल रंगात मला उभं केलं तर माझे कवडसे कसे पडतील ? हे असं सगळं. बहुतेक हा प्रकाशच कधी आपल्या डोक्यात पडत नसावा. का म्हणून मी अशा कल्पना करतो ?

एवढ्या विचारानं तुम्ही बोअर झाला असाल असं गृहीत धरून मी आता तुम्हाला एक गोष्ट सांगतो.

नुसतं ऊन्ह दिसतंय - उजेड दिसतोय म्हणता म्हणता जाळी कशी केव्हा दाटत गेली कळलंच नाही. आणि माझ्या लक्षात आलं की, मी कवडशांमधून चाललो आहे. माझे कवडसे या माझ्याच सावल्या असल्यामुळं जंगलातून वाट काढण्याचा त्रास मला जाणवत नव्हता एवढंच. अशा परिस्थितीत आम्ही भेटलो.

ती खेळाच्या पोषाखात होती. मला म्हणाली, 'तुम्ही इतका विचार कसला करता ? ' काय सांगणार ? काही बोललोच नाही. मग तिनं माझ्या पाठीवर हात ठेवला आणि म्हणाली, ' वेडे आहांत.'

आता एवढ्यावरून मला कळायला हवं होतं की, मी अशा शहाण्या मुलीच्या फंदात पडू नये. आणि तिलाही, की, तिनं माझ्यासारख्या वेड्याच्या. आता कळलं नाही म्हणा किंवा कळून - सवरून दुर्लक्ष केलं म्हणा, आम्ही पडलोच एकमेकांच्या फंदात.

परिणाम व्हायचा तोच झाला. एके दिवशी ती मला म्हणाली, ' तुमचं मला काही खरं वाटत नाही. तुमचं माझ्याशी वागणं हे दुसऱ्या खूप गोष्टींचा एक छोटासा भाग असल्यासारखं वाटतं. तुम्ही स्वतंत्रपणे सर्वच्या सर्व असं माझ्याशी वागतच नाही.' मग मी संतापलो. मला तिच्याबद्दल जे म्हणायचं होतं ते तीच उलट माझ्याबद्दल म्हणत होती. आम्ही खूप भांडलो. आणि मग बळी तो कान पिळी या न्यायानं मी तिला बदड बदड बदडून काढलं. तिला खूप जखमा झाल्या.

आणि नंतर मला भयानक पश्चाताप व्हायला लागला. चुरगळून मरायची वेळ आली इतका पश्चाताप. मग मी तिच्याकडे गेलो. तिच्या पायाशी बसलो आणि मान खाली घातली. ती समजायचं ते समजली. 'आता आपण संपूर्णपणे वागू या. आता, खरंच...' एवढंच ती बोलली आणि कसं कुणास ठाऊक, आम्ही एकदम मूक झालो.

कारण ' आता ' हा शब्द वापरताना आपण पुन्हा त्याच वर्तुळात सापडतो आहोत असं आमच्या दोघांच्याही एकदम लक्षात आलं होतं.

आता तुम्ही मला सांगा, की ही कवडशांची अशी अशी जाळी आहेत हेच आम्ही आहोत याचं प्रतीक आहे -- असं म्हणणं तुम्हाला हास्यास्पद नाही वाटत ?

कल्पनेची मदत घ्या.

(अभिरुची दिवाळी ७१.)

# कक्षा

फाटकन् आपलं एखाद्याला अवाक् करायचं असलं की विचारायचं स्वतंत्र विचार म्हणजे काय हो ? म्हणजे आधुनिक मराठीत ज्याला ओरिजिनल थिंकिंग म्हणतात ते -- ते कोणतं ? सांगा बरं। एवढं विचारलंत की ' हं हं, ते ना, ते म्हणजे' -- असं सुरुवातीला समोरचा लगेच तोंड उघडणार. पण एक-दोन क्षणातच कुणीतरी खिसा पाकीट मारल्यावर साखळी खेचावी तसं थांबलंच पाहिजे गाडं.

समजा की, आपण एक उदाहरणच घेऊ. एक मनुष्य असं म्हणाला की, " समाजातली इतर सर्व नाती - म्हणजे मित्रमैत्रिणी, नातेवाईक, शेजारीपाजारी, सहकारी इ. ही सगळी वाढवण्यासाठी, समजून घेण्यासाठी मनुष्य प्रयत्न करतो. पण नवरा आणि बायको हे नातं मात्र बरंचसं ' गृहीत ' स्वरूपात दुर्लक्षितच राहतं " आता बोला. हा एक ' स्वतंत्र ' आणि 'नवा' विचार आहे की नाही ? याहूनही अधिक रोकडं बोलायचं तर असलं वाक्य ' अनुभव ' सिनेमात आहे. बोला. हा ओरिजिनल थॉट् आहे की नाही ?

तुम्ही म्हणाल की, एखाद्या चांगल्या सिनेमात एखाद्या पात्राच्या तोंडी असलेलं एखादं वाक्य घेऊन हा स्वतंत्र विचार आहे का याचा खल करायचा नतद्रष्ट कपाळकरंटेपणा करायची जरूरच काय ? तर मी आधीच सांगतो, त्या चित्रपटाचा आणि त्या विचाराचाही इथं काही संबंध नाही --कालच तो पाहिला म्हणून उदाहरणादाखल पटकन् तो समोर आला इतकंच. शेवटी उदाहरण हे कधीच खरं नसतं. असो.

` पैसा असलेल्या माणसाला मान असतो, पैशाशिवाय माणूस म्हणजे कःपदार्थ, कोणतेही नियम म्हणजे कृत्रिम, आणि कृत्रिमपणा म्हणजे दडपणं आलीच, कधीच कुणाशीच वाईट वागू नये आणि कुणाबद्दलच वाईट बोलू नये म्हणजे संघर्षहीन राहता येईल...फार तर हे विचार घ्या. हे स्वतंत्र आणि नवे आहेत का ?

आता तुम्ही म्हणाल की, असं सुटं-सुटं एकेक विचारू नका. तो कुणाचा आहे, कुठे आलेला आहे तेही सांगा आणि त्याहीपेक्षा एखादी विचारसरणी ही स्वतंत्र आहे की नाही ते विचारा. ते अधिक सोपं पडेल.

पण आता मी तुम्हाला सांगूनच टाकतो. उगीच जास्त ताणून धरण्यात काही अर्थ नाही. विचार काय किंवा विचारसरणी काय याचं खरं म्हणजे असं असतं की, ते स्वतंत्र आहे की नाही हे सांगण्यांत फारसा अर्थच नसतो. म्हणजे काय आहे की ते सांगताच येत नाही. फार तर आपण आपलं मत व्यक्त करू शकतो. पण त्याला फारसा अर्थ नाही.

किंवा असं म्हणा की, आपल्या मताला जितका अर्थ आहे तितकाच एखाद्या विचाराला वा विचारसरणीला आहे. पण गंमत अशी की एखादं मत ओरिजिनल आहे असं आपण म्हणत नाही आणि विचाराचं मात्र म्हणतो हा फरक का ?

पुन्हा उदाहरण घ्या. दोन अधिक एक बरोबर एक हे नवीन आहे की नाही ? तुम्ही म्हणणार की याला सुसंगत सिध्दता आणून दाखवा. सोपं आहे. पाण्याचे दोन थेंब अधिक पाण्याचा एक थेंब बरोबर पाण्याचा एकच थेंब ! तुम्ही म्हणणार की, भले ! सालं म्हणजे असं थेंबे थेंबे तळे साचत गेले तरी तुम्ही म्हणणार की एकच थेंब ! म्हणजे तळे हा एक थेंब आहे. समुद्र हा एक थेंब आहे ! वा !

बरोबर. असंच. आणि हे सगळं नवीन आणि स्वतंत्र आहे की नाही ? तुम्हाला ते पटतं कितपत वगैरे मत नका देऊ. फक्त नवीन आणि स्वतंत्र आहे की नाही ते सांगा. आता तुम्ही म्हणाल की, असं तर मग सगळ्या वेड्यांनासुध्दा नवीन आणि स्वतंत्र म्हणावं लागेल. तर बरोबर आहे. म्हणावं लागेलच. फक्त मी फक्त वेड्यांना असं म्हणायच्या ऐवजी तुम्हा-आम्हा सगळ्यांनाच नवीन आणि स्वतंत्र म्हणावं लागेल असं म्हणतोय.

प्रत्येक माणूस नवीन आणि स्वतंत्र ! का तर प्रत्येकाचं व्यक्तित्त्व वेगळं ! अणि व्यक्तित्व म्हणजे काय तर असंख्य गोष्टींचे परिणाम साचून बनलेली आणि असे आणखी साचवून घेण्याची क्षमता असलेली वस्तू. सारांश, आपण ज्याला नवीन आणि स्वतंत्र म्हणणार ते मुळात काय असणार -- तर साचलेले परिणाम, संस्कार, व्रण ! मग आपण म्हणणार, छीः ! हे तर मग सगळं सालं जुनं आणि बध्द आहे !

तर मला आपलं असं वाटतं की, नवीन आणि स्वतंत्र काही असलंच तर ते आपण ज्याला नवीन आणि स्वतंत्र म्हणतो त्याच्या कक्षेत नसेल.

(अभिरुचि,मार्च-एप्रिल ७९)

# आवाका

सुरुवातीला तुम्हाला वाटेल की माझा स्वभाव जरा विचित्रच आहे म्हणून. पण मग नंतर तुमच्या लक्षात येईल की तसं काही नाही. मी तुमच्या माझ्यासारखाच - चारचौघांसारखाच आहे. फक्त एवढंच की चारचौघांच्या म्हणून अशा ज्या-ज्या काही सवयी असू शकतात, त्या माझ्या अत्यंत तीव्र आहेत. आणि तीव्रतेची गंमत अशी असते की, तिला ताकदही म्हणता येतं आणि कमकुवतपणाही.

उदाहरण द्यायचं झालं तर मला सगळं काही स्पष्ट-स्वच्छ-ठळक लागतं. वार कोणता आहे ? तारीख काय ? बरोबर वाजलेत किती ? -- हे सगळं. आता या सवयीमुळं होतं काय की माझं सहसा यातलं काहीच आवाक्याबाहेर जात नाही. जर कधी तारीख-वार विसरलोच तर आम्ही गारठलोच म्हणून समजा. ताबडतोब माहीत करून घेऊन घट्ट धरून ठेवणार. आत एक असा कालवा असतो की या संदर्भांमधून जर आपण सुटलोच तर मग उडालोच. त्यामुळे साहजिकपणेच या सर्व संदर्भांमध्ये फिक्स राहाणं आलंच. तारीख-वार या त्या मानानं मोठ्या गोष्टी एक वेळ परवडल्या, पण घड्याळाचं फार वाईट. सालं मागे तरी पडतं  नाही तर पुढे तरी जातं, नाही तर बंद तरी पडतं. आणि बरोबर असतं तेव्हाही मग खात्री राहात नाही. अंतःकरण सारखं दरदरून हेलावत राहातं. सालं घड्याळाबरोबरच बंद पडेल तर बरं असं वाटतं. पण ते खोटं. तो फक्त भीतीचा परिणाम. खरोखर वाटत असतं ते हेच की, सगळं काही बरोबर असावं आणि त्या सगळ्यात आपण अगदी निःशंक असावं. या सगळ्याचा एकूण विचार म्हणजे भयानकच ! सालं आख्खं आयुष्य असंच ?

तुम्हाला प्रत्यक्ष घडलेली एक हकीगत सांगतो. आमच्या गावी एक तलाव आहे. क्षितिजापर्यंत पाणी दिसतं.( मग त्याला सरोवर म्हणावं काय ?) तर मी काठाशी उभा असायचो. माझी अशी कल्पना होती की ( आता मी ' कल्पना ' हा शब्द वापरतोय, पण तेव्हाचं वर्णन करायचं तर तो खोटा आहे ), अगदी लांबून कुठूनतरी काही फार महत्त्वाचे शब्द मला ऐकू येणार आहेत. क्षितिजापलीकडून पाण्यावरून वाहात येणाऱ्या वाऱ्याबरोबर ते शब्द येणार असं मला वाटायचं. त्या शब्दांची वाट पाहायची मला इतकी सवय झाली की, नंतर-नंतर मला भयंकर भीती वाटायला लागली. समजा, एक दिवशी खरंच असे काही शब्द आले तर ? मग हे सगळं संपणार की काय ? एकदा असे शब्द कसे येतात आणि ते काय असू शकतात हे कळलं की संपलंच की मग ! आत्ताच्या माहीतच नसल्यासारखं तेव्हा कसं असू शकेल ? -- आणि या विचारानं मी इतका घाबरायला लागलो की वेड लागायची पाळी आली. तेव्हापासून मी हळूहळू ही सवय बदलत गेलो. तिच्यावरून हळूहळू कादंबरी-वाचनाकडे शिफ्ट् होत गेलो. हल्ली मी कादंबऱ्या नेहमीच वाचत असतो.

आता तरी तुम्ही मला खुळ्यात काढणारच. तुम्ही म्हणणार, अशा प्रकारे शिफ्ट् व्हायची काही जरूर नव्हती ; शब्द कधी आलेच नसते. पण, महाराज, आता लवकरच कधी तरी शब्द येणार अशी माझी खात्री होत चालली होती त्याचं काय ? तुमची अशा परिस्थितीत, समजा, एवढ्यात झाली नसती किंवा एक वेळ असंही समजा की कधीच झाली नसती -- ते सगळं ठीक. पण माझी जी काय गोष्ट झाली ती अशी. आणखी कुणाकुणाचं काही-काही वेगळं होत असेल.

आता मी तुम्हाला खरं-खरं सगळं सांगूनच टाकतो. हे सगळं जे काही आहे ना, ते फक्त मी आत्ताच दिलेल्या उदाहरणापुरतंच मर्यादित नाही आहे. प्रत्येक गोष्टीची मला सतत भीतीच वाटत असते. आता मी कादंबऱ्या वाचतो ना, तर त्यांतल्या पात्रांच्या नात्यांमध्ये जे हळूहळू फरक पडत जातात- त्यांची जी स्वरूपं हळूहळू बदलत जातात, ते मला अजिबात सहन होत नाही. कादंबऱ्यांतून तरी हे नसावं. प्रत्यक्ष आयुष्यात तेच असतं की. त्यामुळे होतं काय की कुठलंच काहीच खरं धरून चालता येत नाही. कुठल्या वेळी आपण कसे वागू आणि त्यातून कशाचं काय होऊन बसेल हे काहीच सांगता येत नाही. पण कलावंताचा म्हणून जो एक प्रॉब्लेम् असतो तोही मला समजतो. सगळं जर आहे तसंच निश्चित हमखास ठेवायचं झालं तर कादंबरी लिहायचीच कशी ? तर कादंबरी लिहायची म्हणजे भीतिदायक असल्या तरी या गोष्टी येणारच.

आणि सगळ्यांत महाभयानक गोष्ट जर तुम्हाला आता सांगायची झाली तर ती म्हणजे ही की, मला आता एक नवीनच लक्षात यायला लागलंय. ते म्हणजे हे की, आपण कितीही जरी सवयी बदलत गेलो आणि काहीही करत गेलो तरी मूलतः काही तरी समानच असतं. आणि हे जे काही समान असतं तेच सारखं आपला पाया पोखरत असतं. त्यामुळं आपण कुठल्याही सवयीत असलो काय आणि कुठल्याही अवस्थेत असलो काय, आपण सतत असे कुरतडले जाणारच.

आणि हे लक्षात यायला लागल्यापासून मला एकच वाटतंय. एक तर मला वेड तरी लागेल नाहीतर मी आत्महत्या तरी करीन.

(अभिरुचि, जुलै-ऑगस्ट १९७१ )

## अवांतर

माणसाच्या आयुष्याला ' उद्दिष्टपूर्तीच्या समस्या ' असं एक बाळबोध नाव द्यायला काहीच हरकत नाही असं मला वाटतं. कुणी म्हणेल की, माणसाचं आयुष्य ही एक फार मोठी, महत्त्वाची आणि अर्थपूर्ण गोष्ट असून ती अशा एखाद्या तात्पर्यात पकडायचा प्रयत्न करणं ही एक विकृती आहे. आणि तुम्हाला आश्चर्याचा धक्का द्यायचा झाला तर या म्हणण्याला मी विरोधी काही बोलणारच नाही. कारण काही काही वेळी अशी पण एक गंमत असू शकते की, डोकं तर विकृत आहे, पण त्याच डोक्याला हे जाणवतंय की आपण विकृत आहोत म्हणून !

आता हेच बघा. एक मळक्या कपड्यांतली मुलगी मातीत खेळत बसली होती. तिथं एक चांगल्या कपड्यांतली मुलगी आली. ' अगं, तू इथून एक खार पळत गेलेली पाहिलीस का ? ' मळक्या कपड्यांतल्या मुलीला काही कळलंच नाही.'खार गेली का खार ?' काही कळेचना. 'अगं, असा एक छोटासा प्राणी असतो तो ? तो प्राणी नाही माहीत तुला ? ' 'हं-हं,कावळा । ' ' अगं, कावळा नाही -- खार, खार !' कळेचना. ' इथून एक प्राणी गेला का -- एक प्राणी असा ? ' नाही 'शेवटपर्यंत कळलंच नाही.' नाही ना, सकाळी आलीवती ती ! परत आली की बघायचीय मला ! आली की सांग हं !'

सांगा, या घटनेचा तुमच्यावर काय परिणाम झाला ? तुम्ही म्हणाल की काय त्या लहान पोरांच्या गोष्टी सांगता ! काही इंपॉर्टंट, विशेष महत्त्वाचं असलं तर बोला. साला टाइम वेस्ट करण्यासारखा जमानापण राहिलेला नाहीय.

मग मी तुम्हाला प्राजंळपणे ( मी कसंही काही केलं तरी त्यात विकृती आहेच हे ध्यानात ठेवा ) सांगतो की, आपल्याकडे -- म्हणजे माझ्याकडे -- सांगण्यासारखं असं विशेष काही नाहीय. बरं, टाइम वेस्ट वगैरे म्हणाल तर आमचा सगळाच टाइम वेस्टच होतोय. तुम्हाला कदाचित् असं वाटत असेल की, तुम्ही तुमचा बराच टाइम सार्थकी लावताहात आणि मला समजा उलट वाटतं. म्हणजे मग आपल्यात तसा मूलभूत फरक काय राहिला ? तुम्हाला कशाचं तरी महत्त्व वाटतं आणि मला नाही वाटत यात मूलभूत काय आहे ? हेच उद्या उलटंही होऊ शकेल. मूलभूत कशाला म्हणता येईल तर म्हणजे अगदी कंप्लीट स्वच्छ ! उलटच्या सुलटच्याचा तिथं प्रश्नच नसला पाहिजे.

माझं म्हणणं तुम्हाला पटलंच पाहिजे किंवा पटताच कामा नये हे माझे दोन्हीही आग्रह नसल्यामुळं मी जे बोलतो ते सगळं सिध्द करण्याची जबाबदारी माझ्यावर नाही. समजा, तुम्ही टाइम फार सार्थकी लावताय असं तुम्ही मला पटवून देऊ शकलात. शक्य आहे. पण ही जर शक्यता आहे, तर त्याचबरोबर दुसरीही एक शक्यता अशी आहे की, नंतर तुम्हाला असं वाटेल की याला साल्याचा हे पटायला नको होतं ! म्हणजे आला की नाही पुन्हा वांधा ! म्हणून मी काय म्हणतो की, ऐकायचं तर ऐकावं, पण सांगणाऱ्यावर जास्त जबाबदारी टाकू नये. कारण मग घोळ काय होईल की एकदा जर यातली जबाबदारी गृहीत धरली तर मग आपलं म्हणणं एकालाच पटवून द्यायचं का चौघांना, का जगातल्या सर्वांना, हे ठरवायला मग तसा काही मार्ग नाही. म्हणजे मग माणसं पटवता-पटवता नाकी नऊ आल्याशिवाय राहातील का ? आणि यातही पुन्हा व्हायची ती गंमत होईलच. तुम्हाला वाटत राहील की तुम्ही टाइम वेस्ट करत नाही आहात आणि मला असंच वाटत राहील की मी करतोय ! असं हे सगळं बिनतोड आहे.

तुम्ही म्हणणार की, सालं मुख्य विषयापेक्षा अवांतरच जास्त चाललंय ! त्या मुलींबद्दल काय ते सांगा. नाहीतर, दुसरी एखादी घटना सांगून तिचा आमच्यावर काय परिणाम झाला ते विचारा. परवडलं.

तर मग मी काय म्हणणार -- भले ! अहो, या जगात मुख्य विषयच नाही, महाराज ! सगळं अवांतरच आहे ! अगदी तुम्ही-आम्हीसुध्दा ! आणि अर्थातच हे सिध्द करण्याची जबाबदारी माझ्यावर नाही.

थोडक्यात म्हणजे, कशाचाही तुमच्यावर जोपर्यंत काहीतरी परिणाम होतोय तोपर्यंत तुम्ही त्या परिणामाला बांधलेले आहात, आणि परिणामांची स्वरूपं ही काही ठरलेली नाहीत. म्हणजे बदलाच्या शक्यता ! सार्वकालीन सत्य असा काही परिणाम असेलच कसा !

मग आता सांगा बरं मुख्य विषय !

( अभिरुचि, फेब्रु-मार्च ७९ )

.

# शब्दजंजाळ

शब्दजंजाळात अडकायला नको असा विचार होता, पण मग हाती काहीच लागत नाही या निमित्ताखाली शब्द आलेच.

एकाच शब्दाच्या किती नाना तऱ्हा असतात ! फांद्यांचे आणि पानांमधल्या आभाळाचे इतके असंख्य आकार आणि प्रकार दिसतात की काही विचारू नका. आणि असं काही पाहण्याच्या सवयीनं मग एखादं झाड हे एखाद्या नरभक्षक झाडासारखं तुमच्या व्यक्तिमत्वाला वेढून बसतं. तुमच्या सुखदुःखांचं, तुमच्या बदलत्या मनोवस्थांचं एक समांतर-एकजीव अस्तित्वच होऊन बसतं. आपल्या भाषेतले शब्द म्हणजे अशा एखाद्या झाडासारखेच असतात बघा ; आणि एखाद्या भुतानं आपलं झाड धरावं तसे ते आपलं आयुष्य व्यापून बसतात.

तुम्ही मला म्हणाल की हुशार आहात. थोडंफार गुंतागुंतीचं लिहिता येतंय त्याचा फायदा घेऊन आम्हाला मामा बनवताय. ' शब्द हाचि देव...शब्देंचि त्याची...पूजा करू ! ! ' वगैरे तुम्हाला माहीत दिसत नाही. शिवाय ओंकार हा एक शब्दच आहेना,त्यात तर सगळंच आलं.( तुमच्यासारखे बंडलबाजही त्यात आले - हे असंही तुम्ही मनात म्हणाल. )

पण खरं सांगतो, आपल्याला काही कुणाच्या बाजूनं बोलायचं नाहीय किंवा कुणाचं म्हणणं खोडून काढायचं नाहीय. शिवाय मुळात कित्येक गोष्टींचे अर्थ आपल्याला कळतच नाहीत ही एक अडचण आहेच. सारांश, मी काही तसा धोकेबाज माणूस नाही. जे पाहिलं तेव्हढंच बोलतोय. आता तो कदाचित भ्रम असेलसुध्दा.

शब्द म्हणजे आपल्या इच्छा. शब्द म्हणजे आपली नोकरीची क्वॉलिफिकेशन्स. शब्द म्हणजे आपल्या निवडी आणि आपले मार्ग. शब्द म्हणजे आपली नाती आणि शब्द म्हणजे आपण स्वतःच -- आपल्या नावासकट.

एवढं लक्षात आल्यावर म्हटलं, हा शब्द तर साला बाप दिसतो ! म्हणजे साला आपण आधी स्वतंत्रपणे जन्माला आलो आणि मग आपला शब्द झाला की मुळातच आपण शब्दरूप जन्माला आलोय ? आता याचा काही प्रत्यक्ष शोध घेणं जमणारं नव्हे. पण अंदाजानं एक लक्षात आलं की, बहुतेक प्रथम आपण शब्दाचं अज्ञानरूप होतो ते हळूहळू 'समजूतदार' होत गेलो. पण कायद्याचं अज्ञान हे काही गुन्ह्याचं समर्थन होऊ शक्त नाही. आणि हा खोडा अगदी पर्फेक्ट बसला ! कारण अजूनही आपण अज्ञानीच असण्याची शक्यता तशी सहजासहजी डावलता येण्यासारखी नाही.

इथं गोष्ट सुरू होते. शब्दाला एकदा असा प्रश्न पडला की मी दुःखी का ? शब्दानं त्यावर खूप विचार केला. उत्तरं अनेक सुचली. पण विचार जसा दिशा बदलेल तशी उत्तरं बदलत राहिली. तेव्हा मात्र शब्द हवालदिल झाला आणि वेड्यासारखा भन्नाट पळत सुटला. या प्रश्नाचं उत्तर नाही सापडलं तर आपले बारा वाजणार हे त्याला कळून चुकलं. तळ्यातलं पाणी पिता-पिता त्याच्या लक्षात आलं की, तळ्यालाच हा प्रश्न विचारून बघावा. विचारल्यावर आश्चर्य म्हणजे तळ्यातलं त्याचंच प्रतिबिंब म्हणालं,' मीही त्याच विचारात आहे आणि खूप घाबरलोय.' -- आणि ते थरथरत राहिलं. याचा परिणाम एवढाच झाला की त्याची स्वतःची भीती दुप्पट झाली. एकदोन ठिकाणी असे उलटे अनुभव आल्यावर शक्यतो कुणाला विचारायचं नाही असं त्यानं ठरवलंन. पण शोध चालू ठेवला

एके दिवशी चमत्कार झाला. त्याचं स्वतःचं पोट फुटलं आणि त्याला काही ऐकू आलं ' मूर्खा, तुला दुःख होतंय हा तुझा भ्रम असून सत्य हे आहे की तू स्वतःच दुःख आहेस.'

म्हणजे आत्महत्येचाच प्रसंग समोर उभा ठाकला ! दुःखात जगायचं नसेल तर आत्महत्या करा ! दरदरून घाम फुटला. झक मारली आणि हा सगळा शोध घेण्याच्या फंदात पडलो असं वाटायला लागलं. आणि भयंकर गोष्ट म्हणजे दुःखाची तीव्रता अधिकच जाणवू लागली.

इथं गोष्ट अर्धवट अवस्थेत संपते. काही प्रश्न : शब्दाला शब्दापासून मुक्ती कशी मिळणार ? दुःखात जगत राहण्यात काय अर्थ आहे ? शब्दाचं अस्तित्व नष्ट होऊन जगण्याचा शब्दाशी संबध काय ? दुःखाच्या कविता करून इतर शब्दांना त्या ऐकवण्यात अर्थ काय ? शब्द शब्दांचा उपभोग का घेतात ? इत्यादी.

भयानक म्हणजे प्रश्नांची उत्तरं तर नाहीत आणि शब्दांची झाडं तर वाढतायत !

( अभिरुचि, फेब्रु-मार्च ७८ )

# शहाण्यांच्या जगात

एका विवक्षित कादंबरीवर चर्चा सुरू होते. थोड्याच वेळात ती कादंबरी ' आस्तित्ववादी ' आहे काय असा मुद्दा निघतो. मग ' अस्तित्ववाद ' म्हणजे काय ? -- यावर चर्चा सुरू होते. दहा जणांची दहा मतं पडतात. एका महान विद्यापीठातले महान गणले गेलेले एक तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक त्याचा काही अर्थ लावतात. दुसरे एक विव्दान उभे राहून अस्तित्ववादाचा खरा अर्थ नेमका उलट कसा आहे ते विशद करून सांगतात. पहिला पुन्हा चेवानं काही म्हणू जातो. त्याचा विदूषक होतो. असंच पुढे.

अनेक विव्दान जमलेले आहेत. माणसाच्या मानसिक,सांस्कृतिक, मानववांशिक, यौध्दिक वगैरे वगैरे इतिहासांच्या पार्श्वभूमीवर कुठलातरी विषय तपासला जातो आहे. प्रत्येकाचा दृष्टिकोण निराळा आहे. प्रत्येकाच्या प्रतिपादनात अनेक प्रकारचे आणि अनेक पध्दतींनी वाद होऊ शकतील असे विवाद्य मुद्दे आहेत. मुद्यांतून मुद्दे. मुद्यांतून मुद्दे. विखुर विखुर विखुरलेले अस्ताव्यस्त मुद्दे...मुद्यांचा एक महाशहाणा समुद्र.

तर संपादकमहाशयांना आम्ही काय म्हटलं, की कबूल. आम्ही मूर्ख आहोत. पण म्हटलं काय हो शहाणे तेवढे स्वयंभू आणि मूर्ख तेवढे कुणाच्या तरी दृष्टीकोणातून पाहिलेले -- हा कुठला न्याय ? आणि हाच न्याय उलटा फिरला तर शहाणेही मूर्ख ठरू शकतातच. म्हणजे मूर्खाच्या विरुध्द शब्द शहाणा. बरं, वेड्याच्या विरुध्दही परत शहाणाच. पण मूर्ख माणूस काही वेडा असेलच असं नाही. तसंच वेड्या माणसाला काही मूर्ख म्हणता येईलच असंही नाही. शिवाय मूर्खांचं जग जर प्रभावी ठरलं तर ते एखाद्या तथाकथित शहाण्या, अनुभवी म्हाताऱ्या बेडकाला समुद्रात ढकलून देणारच. आणि चढ म्हणजे ते त्याला कधी शहाणा तर समजणार नाहीतच, पण वर मूर्ख समजणार. म्हणजे तुम्हाला जे जसं समजलं ते तसंच आम्हाला समजलं पाहिजे. नाहीतर आम्ही म्हणणार की तुम्ही मूर्ख आहात.

एवढं म्हटल्यावर संपादकमहाशय दचकलेच. म्हणाले, बरं ठीक आहे, तुमचं म्हणणं काय ?

म्हटलं, प्लीज. जरा थांबा. कारण शहाणे, मूर्ख आणि वेडे या तिघांतल्या सीमांबद्दल आम्हाला जरा अजून बोलू द्या. या सीमा अधिक संघर्षमय होऊ नयेत असं वाटत असेल, तर म्हटलं सर्वांमध्येच एक प्रकारचं सलोख्याचं वातावरण टिकवण्याचं सर्वांनीच ठरवलं पाहिजे. नाहीतर संधी मिळेल तेव्हा दुसरा पहिल्याचं उट्टं काढू शकेलच. हे तुम्हाला मान्य आहे का ?

संपादकमहाशयांनी डोकं खाजवलं. म्हणाले, हो, मान्य आहे.

मग म्हटलं तुमच्या मासिकातलं एक पान आम्हाला द्या. आजच्या शहाण्यांच्या जगातले आम्ही एक हमखास मूर्ख आहोत. एवढंच नव्हे, तर मूर्ख म्हणून आम्ही सिध्दही झालेले आहोत. तुम्ही सगळी जागा शहाण्यांनाच देता. मूर्खांचं प्रतिनिधित्व कुठाय ? शिवाय वेडे जर तिसरे धरले तर ते कुठायत ? तर आमच्यात तेही गुण आहेत. आम्ही त्या दोघांचंही प्रतिनिधित्व करून तुमच्या मासिकाला परिपूर्णता देऊ शकतो. बोला.

तर वाचकहो, त्यांच्याशी आमच्या वाटाघाटी यशस्वी झाल्या. म्हणून आता तुमच्याशी थोडं प्रास्ताविक बोलून घेतो. कारण कुठल्याही अवघड गोष्टीला आधी प्रास्ताविक जोडायचं हा शहाण्यांच्या जगातला नियम आम्ही तात्पुरता मानतो आहोत. कारण तुमच्यापैकी बहुसंख्य लोक शहाणे आहेत असं संपादकसाहेबांकडून मिळालेल्या माहितीवरून समजलं ( आता तुम्ही त्यांचं मासिक वाचता हे एक आहेच ) तर हा मूर्खांचा बाजार तुम्हाला जरा अवघड आणि तितकाच महागही पडण्याची शक्यता आहे. सारांश, प्रास्ताविक हवंच.

प्रास्ताविक म्हणजे दुसरंतिसरं काहीही नाही. फक्त एक विनंती. आम्ही जे घडवण्याचा विडा उचललेला आहे ते म्हणजे एक स्वाभाविक जातिवंत दर्शन. दणदणीतपणे त्याला मूर्खपणा म्हणता येईल. पण आमच्या या प्रखर अशा जातिवंत मूर्खपणाला तुमच्या शहाण्यांच्या जगातले अर्थ लावत बसायचा मूर्खपणा करू नका. दुसरं काही नाही, तुमचं डोकं फिरून जाईल. आणि तुमचा असा पराभव व्हावा अशी आमची इच्छाही नाही. किंबहुना तुमचा कसलाच पराभव करायची आमची इच्छा नाही. कारण आम्ही मोठ्या, अनंत आणि बेमुर्वत मनाचे आहोत.

आमचा उद्देश फक्त इतकाच आहे की बुवा काही नाही, जरा आमचंही जग तुम्हाला दाखवावं. बस्स ! त्यातून समजा चुकूनमाकून तुम्हाला जाणवलंच की बुवा तुमच्या आमच्यात खरं म्हणजे काही फरक नाहीयाय -- आपण सारे भाऊ भाऊ आहोत, एकोपा होऊन जाईल.

तर करतो आम्ही सुरुवात आमच्याच डोक्यावर हाणून एक हातोडी...हिप हिप हुर्रे...

(सदर-- हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर, सप्टेंबर ६९ )

# मुखवटे

एक होता पोलीस. त्याला लहान मुलं खूप आवडायची. वाटायचं अवतीभवती चार नकटी चिंगटं असावी. हसावं, त्यांना चिमकुटे घ्यावे, त्यांनी हाऽत् केल्यावर खोटंखोटं रडावं आणि मग एकदम तोंडावरची बोटं काढून धो धो हसावं. त्या हसण्यात ती पोरंही सामील व्हावी आणि एकच कल्लोळ उडून जावा.

पण त्याची डिफिकल्टी अशी होती, की त्याला अजून मूल नव्हतं. बरं, दुसऱ्यांची पोरं म्हणावी तर ते आईबाप आपले ' तू अमूक केलंस तर हे पोलीसबाबा तुला मारतील ' किंवा ' पिशवीतून घेऊन जातील. ' हे आपल्या पोरांना सांगून स्वतःची तात्पुरती कटकट मिटवण्यासाठीच त्या पोलीसाचा उपयोग करत. बरं, पोलीसही एका लिमिटच्या पुढं आईबापांवर कावू शकत नसे. आणि ती लिमिटही त्याच्या मनातल्या आतल्या भागातच होती. बाह्यात्कारी मग तो चेहरा ग्रिम करी. डोळे दटावल्यासारखे करी. समोरचं मूल नाही म्हटलं तरी थोडं ट्रबलमध्ये आल्यासारखं गप्प होई, आणि मग दहा दहा सेकंदानी साशंकपणे त्याच्याकडं पाहात राही. तो मग त्या मुलाकडं आपलं आता लक्ष नाही असा साळसूद बसून राही. चेहरा अतिशय सौम्य करी. एवढ्यानं ते मूल आपल्याला भ्यायचं सोडून देईल असं त्याला वाटे.

शेवटी त्याला कळून आलं, की काही नाही, आपल्या या गणवेषामुळंच आपल्यावर ही आपत्ती येते. गणवेषामुळं आपलं मनुष्यत्व हरपून आपण नुसता एक शिस्तीचा करडा पुतळा बनतो. आपल्या चेहऱ्याला नाहक कंगोरे प्राप्त होतात. आणि डोळे नाहक कोरडे पडतात.

ही गोष्ट बरेच दिवस त्याच्या मनात धुमसत राहिली. शेवटी तो इतक्या पराकोटीच्या नाजूक अवस्थेत आला, की त्यानं ठरवलं. साहेबाला आपली ही सहृदय डिफिकल्टी सांगायची आणि म्हणायचं पगार वाटलं तर दीडदोन रुपये कमी द्या पण मला बिनगणवेष नोकरीवर राहू द्या.

तो एका धुंदीतच साहेबापुढं आला. काही बोलण्यापूर्वी त्यानं सवयीनं खाडकन सलाम ठोकला. साहेबाचा निबर चेहरा किंचित हलला. प्रश्नार्थक वर उचलला गेला. " साहेब मला मुलं फार आवडतात " एकंदर परिस्थितीत पोलीस प्रस्तावनेशिवाय बोलला.

त्याबरोबर फुगा फुटल्यासारखा साहेब फुटला. धबाधबा हसू लागला. देह घुसळून हसू लागला. चेहऱ्यावरची कातडी ताणली जाऊन चकाकू लागली तरी तो हसतच राहिला. " अरे मग तुझ्या बायकोला नाही का मुलं आवडत " साहेब हसताहसता म्हणाला आणि पुन्हा हसू लागला. साहेबाच्या या ज्योकवर आजूबाजूचे आणखीही कुणीकुणी हसू लागले.

पोलीस वरमला. भयंकर शरमला. यापुढं काही बोलायचं त्याला धाडस झालं नाही. त्याला कंप्लीट चुरगाळून गेल्यासारखं वाटलं. पण तरीही सवयीनं खडामकन सलाम ठोकून तो बाहेर पडला.

थोडे दिवस ही गोष्ट त्याला फारच लागून राहिली. त्याचं मन कुरतडत राहिली. पण ' टाईम इज द हीलर ' असल्यामुळं व्रण राहणारच असला तरी जखम भरून आली. मुलं पाहिली, की मन ढवळून यायचं. पण लांबूनच. जवळ जायची छाती व्हायची नाही. ती घाबरली तर ? केवढी भयानक गोष्ट.

नंतर त्यानं ठरवलं, की थोड्या जास्त वयाच्या मुलांपास्नं आपण सुरुवात करू. एका सुट्टीला त्यानं ' लोकमान्य टिळक ' या विषयावर वक्तृस्पर्धा ठेवली. गल्लीतरी इकडची तिकडची दहाबारा पोरं जमली. पण एकंदरच, बक्षीस मिळवणं आणि भाषण करणं यात सगळीच कॉन्शस होती. ' शांत चित्तानं ऐकून घ्या ', ' चिखलात उगवलेलं कमळ ',' मी चहाडी करणार नाही', ' स्वराज्य हा माझा जन्मसिध्द हक्क आहे' आणि ' कॉलेजचं एक वर्ष फुकट घालवून प्रकृती सुधारली ' वगैरे वगैरे ऐकून पोलीस चिंबून गेला. हे तर सगळे मोठ्यांचे खत्रुड मुखवटे. तुरुंगवास, गीतारहस्य वगैरे वगैरे कश्शानं पोलिसाचं समाधान होईना. बरं, सुरू केलेली स्पर्धा मध्येच थांबवून टाकणंही त्याला बरोबर वाटेना.

स्पर्धा संपली. त्यानं कुणाला तरी बक्षीस देऊन टाकलं. आणि पोरं पांगल्यावर निवांत बसून राहिला. त्यात मध्येच त्याच्या लक्षात आलं की त्यातल्या त्यात बरं पाठांतर असलेल्या आणि मुद्देसूद बोलणाऱ्या पोरालाच आपण बक्षीस दिलं. तेव्हा तर तो अधिकच वैतागला. हा वैताग एखाद्या आगबोटीभोवतीच्या समुद्रासारखा वैराण पसरू लागला.

आणि मग पोलीस त्या सीमेजवळ पोचला. त्याचे डोळे ताणले गेले. कपाळावर साडेतीन हात आठ्या उमटल्या, आणि एकाएकी कचाकच त्यानं अंगावरचा गणवेष फाडायला सुरुवात केली.

लोक असे खुळे, की म्हणायला लागले की अमुक अमुक पोलीस एकाएकी वेडा झाला.

(सदर -- हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर, ऑक्टोबर ७९ )

# मी आणि ओंडका

खरं म्हणाल तर मी काही ओंडका नाही. पण मला कधीकधी वाटतं, की मी ओंडकाच आहे. म्हणजे मी अशक्तपणामुळं वगैरे निर्जीव पडून राहतो असंही नाही. चांगला टणटणीत असतो. हसत-खेळत, हिंडतफिरत असतो. पण एक असं ' फीलिंग ' तयार झालेलं असतं की, आपल्याला आता पाण्यात टाकलं तर आपण अगदी बिनधोक तरंगू. तरीसुध्दा कुणीतरी उठून आपलं खरोखरच पाण्यात टाकत नाही हेही बरंच आहे. कारण मी पोहायला शिकलेलो नाही. पण हे सगळं नंतरचं. त्या वेळी मात्र मला पक्की खात्री असते की मी ओंडकाच आहे.

त्यामुळं कधीकधी माझ्या डोक्यात असं एक चित्र येतं की, मी मेलोय. नंतर लाकडं हवीतच. कारण त्याशिवाय तो माणूस पुन्हा उभा राहण्याची इतरांची आशा नष्ट होऊ शकणार नाही. त्या आशेला काही मूर्तिमंत काडी लावता येत नाही. मग आणा लाकडं. तर मला जर जाळायचं असलं तर मलाच फोडायचं की आयतीच लाकडं तयार. लावायची काडी. कारण असं आहे की, मला एक आपला आत्मविश्वास आहे की मला मरण येईल ते ओंडक्याच्या रूपातच. मग तुम्ही मला मी म्हटलंत काय किंवा ओंडका म्हटलंत काय -- काही फरक राहणार नाही.

पण तुम्ही मला मीच म्हणा. माझा ओंडका ही सुध्दा एक स्पष्ट वस्तुस्थिती असली तरी त्यामुळं प्रत्यक्ष माझ्या अस्तित्वाला बाध यावा असं मला वाटत नाही. कारण तो काय, माझा भाससुध्दा असू शकेल. पण मला स्वतःलाच काही माझा भास म्हणता यायचं नाही. म्हणजे म्हणता येईल, पण ते दुसऱ्याला. मी स्वतःच ते म्हणणार नाही. यातली सगळ्यात भयंकर गोष्ट ही आहे की, मी ओंडका असतो तेव्हा असले कुठलेच विचार डोक्यात येत नाहीत. त्यामुळं त्या वेळी मी पूर्णपणे निर्भय असतो. पण त्यामुळं नंतर मला फारच भीती वाटते. आपल्याच भासानं आपल्याहून अधिक खरेपणानं आणि निर्भयपणानं या जगात वावरावं हे मला सहन होत नाही. अगदी वेड लागायची पाळी येते.

आधी हे असलं काही होत नव्हतं. पण एक गोष्ट मात्र निश्चितपणे मला भेडसावत होती. आणि ती म्हणजे माझं मरण. मला फार भीती वाटायची. एक दिवस मी चिकार वैतागलो, खूप चिडलो. आणि त्याचा परिणाम असा झाला की, मी स्वतःलाच भेकड, नपुंसक वगैरे शिव्या द्यायला लागलो. आणि रागाच्या भरात मी एकदम फटकन मलाच नाकारून बसलो. म्हटलं या एवढ्या अवाढव्य अनंत विश्वात असलं, इतकं भित्रट असं काही असूच कसं शकेल ! असलं तर तो या विश्वाचा अपमान आहे. ते नष्टच झालं पाहिजे. आणि त्याच क्षणी माझा एक ओंडका झाला. मी त्याला अर्थात भासच म्हणणार. कारण नाही तर मी स्वतःच एक भास ठरेन. आणि हे तर मग मृत्यूहूनही भयानक आहे. एका भासाच्या मृत्यूची त्या भासालाच भीती वाटतेय. त्यातून तो एक ओंडका होतोय आणि अरे बापरे...आपला विषय कुठला चाललाय ते धरून ठेवणंसुध्दा किती कठीण आहे....च्या मारी त्या गुंत्याच्या बैलाला....

माझेसुध्दा एकदोन हितचिंतक आहेतच. तर त्यांनी ठरवलं की, मला या लढाईतून मुक्त करायचं. कधीही वेळ मिळाला की ते यायचे. कधी मिळून, कधी एकेकटे. आणि मला कोमल, मृदू शब्दात पटवून द्यायचे की, भासबीस सोडून एक सरळ, एक नॉर्मल माणूस म्हणून जगायला लाग बघू. अरे, तू ओंडका कसा असू शकशील ? तू तूच आहेस. तू ओंडका नाहीयस. शेवटी माझं मलाच वाटायला लागलं की, मी ओंडका असल्याबद्दल मला वाटतं त्याहूनही बऱ्याच मोठ्या प्रमाणात माझी खात्री झाली असली पाहिजे. नाहीतर हे बिचारे कशाला एवढा त्रास घेतील ?

शेवटी मला माझ्या सारखेच काही ना काही भास होणाऱ्या लोकांमध्ये त्यांनी सोडलं. कुणाचं काय, कुणाचं काय. मला ते असह्य झालं. मी जोरात ओरडायला लागलो -- मी ओंडका नाही, मी ओंडका नाही...

कुणी हसलं. कुणी ऐकलं न ऐकल्यासारखं केलं. कुणी डोळे पुसले. मी पुन्हा ओरडलो -- मी ओंडका नाहीयाय.

आणि त्याचबरोबर दुसरं कुणीतरी काहीतरी ओरडत असल्याचं मला ऐकू यायला लागलं. आवाज मोठामोठा होत जवळ जवळ येत स्पष्ट स्पष्ट व्हायला लागला.

मी मी नाहीयाय.

मी मी नाहीयाय.

मी मी नाहीयाय.

मी मी नाहीयाय, मी मी नाहीयाय.

ओरडणारा माणूस स्पष्ट स्पष्ट होत, जवळ जवळ येत, मोठा मोठा होत होता. अरे बापरे. तो म्हणजे दुसरा तिसरा कुणी नव्हे तर मूर्तिमंत आणखी एक मीच.

( सदर- हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर डिसें.६९)

# कोव कोव कोवळ्या कोव कोव

**कोव कोव कोवळ्या पोरी**
**पाहून**
**पुरात फसलो भारी**
**अमुची रीत जगावेगळी**

कशी आहे ? नो नो. उत्तर नको आहे आणि टीकाही नको आहे. टिळा लाविते मी रक्ताचा. थुत्. सगळीच एक प्रचंड गंमत आहे साली ! म्हणजे होतं काय की आपला उद्देश वेगळाच असतो आणि होतं वेगळंच. कसं ते सांगायचं झालं तर परवाचीच गोष्ट. आम्ही बसमधून उतरलो तेव्हा आमच्या कॉलनीतले दिवे गेलेले होते. पण रस्ता आपल्या पायाखालचा. म्हणजे तसं कुठल्याही रस्त्याला डोक्यावर घेणं वाईटच. आणि शिवाय त्याची जागा जितकी अधिक पायाखालची तितका तो अधिक सुरळीत असतो. आम्ही निघालो. बस दुसरी माणसं चढून घेत तटस्थ स्टॉपवर उभी.. आम्ही अर्थातच पुढे तर मागून बसच्या दिव्यांचे करेक्ट लाईनशीर फवारे. तर सांगायची गोष्ट म्हणजे त्या भरघोस उजेडात कधी नव्हे ती आमची सावली आमच्या लक्षात आली. म्हटलं साली ही एवढी मोठी चीज पण जन्माला आल्यापासून आपण काही हिला अजून पाहिली नव्हती. मी चक्क तिच्या प्रेमातच पडलो. म्हटलं हिला पादाक्रांत केल्याशिवाय काही खरं नव्हे. बस अजून उभीच होती. सावली आपली चाललीय ढिंग ढिंग ढिंग ढिंग. कुठच्या कुठं !

अक्षरशः पेटलोच. तिच्यावर स्वार झालो, आणि खोल खोल पुढे पुढे निघालो. आभाळाचा रंग निळा तसा सावलीचा रंग काळा. आमच्या डोक्यात आली एक आयडिया. तसं विशेष काही नाही. सहजच. अंधार म्हणजे तरी काय प्युअर काळा रंग. मी आपलं सहज म्हणालो की, स्टॉप ! ताबडतोब पांढरा हो. पण म्हटलं एवढं करून थांबण्यासारखं नाही. पांढऱ्याला म्हटलं निळा हो, पिवळ्याला म्हटलं लाल हो, आणि सगळ्यांत विनोदाची गोष्ट म्हणजे हिरव्याला आम्ही करडं व्हायला सांगितलं.

हा हा हा हा हा !

रंगांच्या दुनियेत असा कल्लोळ उडालाय म्हणता. सगळे घाबरून थरथरायलाच लागले. पण मग मात्र मी थोडासा दचकलोच. म्हटलं हे साले भीतीने गारठून मरून गेले तर आपल्या डोळ्यांना कुणी वालीच राहणार नाही. तेव्हा मग उदार हसून मी प्रत्येकाच्या गालावर टिचक्या मारल्या. म्हटलं वेडे की काय, अरे गंमत केली तुमची !

हे असं होतं. तर विषयाला जागून सावलीचा किस्सा जर पुरा करायचा झाला तर तो असा. ती आणि मी एका ब्रिजवर उभे असताना मागून एकदम बसच निघून गेली. खुर्चीवर बसायला गेलो तर खुर्ची ढगात आम्ही मातीत. ती एकदम कुठं नाहीशीच झाली. पण थोड्या विचारांती एक गोष्ट माझ्या लक्षात आली. आणि ती म्हणजे ही की कंप्लीट अंधार हीच खरं पाहता आपली सावली आहे. उजेडामुळं फक्त तिला आपला आकार येतो. म्हणजे एवढ्या सगळ्याचं शेवटी सार काय तर उजेड भडवा चोर आहे. खोटा आहे. धपकन कोसळण्यातूनसुध्दा कधीकधी सत्यदर्शन होतं ते हे असं.

सत्यदर्शन झालं खरं, पण मार लागलेली जागा काही, काही केल्या दुखायची थांबेना. मनात आलं, की मग शेवटी सत्य तरी असून असून किती पावरबाज असू शकेल ? तुम्ही जर दाणकन धोंड्यावर बदडला गेलात तर त्याच्या झिणझिण्या या तुमच्या सत्यालासुध्दा येणारच. त्यापेक्षा मग असत्य ही जास्त खरी गोष्ट आहे. ते निदान काही आशा तरी लावत नाही.

हां, तर आशा. म्हणजे त्या ज्या पोरी होत्या त्या पाहून आम्ही पुरात फसलो असं जे मी मघाशी म्हणालो ते यासाठीच. आशेबिशेचा प्रश्न नाही. या पोरी हे तुम्ही. डायरेक्ट पूर सुरू. पण दुसऱ्या बाजूला तुम्ही असता कुठंतरी सत्यवादी. म्हणून मग तुम्ही या धुवांधार पुराच्या बाबतीत ' फसलो ' हा शब्द वापरता. सारांश आमची ती कविता ढोंगीपणाची आहे. म्हणून असत्य आहे. आणि म्हणूनच जास्त खरी आहे.

ही खरी टीका. नाहीतर तुम्ही काय म्हणणार, रक्ताचा टिळा कुठाय दाखवा -- बरं मला टिळा लावायला तुम्ही काही तुमचं रक्त देणार नाही आणि दिलंत तर कधीतरी म्हणणार हा भडवा माझ्या रक्ताच्या टिळ्यावर निवडून आलाय आणि आता रक्ताच्या गोष्टी करतोय. म्हणून म्हणतो की रक्ताचा उपयोग जास्ती करून माणसाच्या शरीराच्या आत वाहण्यासाठीच झाला पाहिजे. बाहेर टिळा लावण्यासाठी होता कामा नये.

पण आमचंच आर्ग्युमेंट आमच्यावर उलटवत तुम्ही म्हणणार, ठीक आहे, ही गोष्ट खोटी आहे असंच तुम्ही म्हणतायना - मग म्हणूनच ती जास्त खरी आहे असं आम्ही म्हणतो -- आता बोला ? मग पंचाईत आहे.

(सदर-- हिप हिप हुर्रे ऽ--मनोहर जाने.१९७० )

## मी का ही ही घेतलेलं नाही --

मी काही इथं कीर्तन करायला बसलेलो नाही. मी फक्त तुम्हाला शिकवतोय. महाभारताचं युध्द होऊन किती वर्षं झाली ? आठवत नसलं तर सोडून द्या. पण जगात देव एकच. ब्रह्मा, विष्णू आणि महेश.

मला अजिबात घाबरू नका. कारण मी एक माणूस आहे. माणसाला अजिबात घाबरायचं नाही. घाबरायचं फक्त देवाला. जो माणसाला घाबरतो तो आईबापांच्या पोटी जन्माला आला नाही. जो देवाला घाबरत नाही तो पण.

तुम्ही सगळी अस्पष्ट माणसं आहात. मी एक दुर्बल दुर्गुणी माणूस असून माझा उद्देश नसताना तुमची करमणूक होतीय असे तुमचे चेहरे ढोंगी तटस्थ आहेत. पण असं योग्य नव्हे. तुम्ही मला परका समजताय पण मी तुमच्यातलाच आहे. तुमच्यातला कुणीही, केव्हाही माझ्याइतकाच एक शुध्द माणूस होऊ शकेल. आणि अशा माणसाला तुम्ही घाबरायचा प्रयत्न करता !

या जगात एक अवाढव्य संगीत चालू आहे. तुम्हाला त्याची दखलही नाही. तुम्ही नुसते डोळे मिटून वल्हवणारे क्षुल्लक नावाडी आहात. साहेबाच्या अहंकारी थुंकीच्या एका थेंबाबाहेर तुमची नाव जाऊ शकत नाही. तुमच्या डोक्यात असंख्य भोवरे फिरतात. येता-जाता आरशात बघून तुम्ही आपल्याही थुंकीचं मोल शोधता. पण मी तुम्हाला सांगतो. थुंकी ती थुंकीच. थुंकीचं मोल तिच्या मालकाकडं बघून करणारी आपण माणसं आहोत. आपल्या थुंकीत कुणाकुणाची आयुष्यं वितळताहेत यात आपण ग्रेट ठरतो. मी काही कीर्तन करत नाहीय. तुम्ही सांगा बघू, महाभारताला किती वर्षं झाली ?

तुमचे डोळे कधी अर्धवट उघडे राहिलेत ? एखाद्या वाद्याची नाजूक तार कंपवून पाहा. एक दोन तीन चार... सेकंद जात राहतात. तार अजून थिर्रर्रर्र. किंचित. पण सतत. तसं आहे हे जग. एक प्रचंड संगीत. तुम्ही फक्त ते जरा लांबून बघायला पाहिजे आणि ते बघायची तुमची इच्छा मेल्याशिवाय ते तुम्हाला दिसणारच नाही. ही यातली अढी आहे. माझा तोल जातोय हे खरं पण मी काहीही घेतलेलं नाही. आणि मुख्य म्हणजे तुम्ही मला अजिबात घाबरू नका.

आपण सबंध उद्ध्वस्त झालोय असं कधी तुम्ही बघितलंय ? नसेल तर पहिल्यांदा म्हणजे तुम्ही भित्रे आहात आणि तिसरं म्हणजे त्यामुळंच तुम्ही दुर्दैवी ठरता. तुमच्यातल्या प्रत्येकाला ही स्थिती खरं म्हणजे कधीही पाहता येणं सहज शक्य आहे. आपण मुळीच उद्ध्वस्त नाही. एवढंच नव्हे तर आपण कधीच उद्ध्वस्त होणं शक्य नाही. हा विश्वास बालिश असला तरी त्यानं कधीच तुमचं थडगं बांधलेलं आहे. ते थडगं जर का फोडून भरभन्नाटपणे तुम्ही बाहेर आला नाहीत तर मी तुमच्या वाऱ्यालासुध्दा उभं राहणं टाळीन. कारण थडग्यांची मला भीती वाटते. मुख्य म्हणजे किळस येते. कारण प्रत्येक थडग्यातून नुसते थुंकीचे प्रवाह वाहात असतात. आणि सगळ्यात भयानक गोष्ट म्हणजे ही थडगीच माझ्यावर कुरघोडी करून मलाच घाबरायला बघतात !

बरं ठीक आहे. गप्प बसतो. हे बघा.

मला माहितीच होतं की माझ्या बोलण्याइतकंच माझ्या गप्प बसण्यातही तुम्हाला हसू येणार ; पण तुमच्यातला एकही माणूस शहाण्यासारखा विकट हसू शकला नाही. यात काय ते समजा

( सदर-- हिप हिप हूर्रे ऽ --मनोहर - फेब्रु.१९७० )

# कंटाळा अमुचा चाळा

कंटाळासुध्दा थोडा जर वाजवीपेक्षा जास्त आला तर, एक प्रकारची गळचेपीच सुरू होते. तसंच झालं होतं. डोक्यात मग हळूहळू पायऱ्या उगवायला लागल्या आणि एकमेकांत अडकून अडखळून पडायला लागल्या. पण कंटाळा कायम.

त्यात एक गोष्ट अशी गमतीची जाणवत होती,की काहीतरी मागंपुढं होतंय. म्हटलं हे काय आणखी नवीन? म्हणून मुद्दाम बघायला लागलो. पहिल्यांदा वाटलं आळसावलेल्या डोळ्यांच्या कल्पनाशक्तीतून जन्म पावणारा हा एखादा प्रकाशाचा तंतू असेल. पण निरखून पाहिलं तरी मागंपुढं चालूच.

या पाहण्याचा परिणाम असा झाला की, ती क्रिया अधिक कणखर आणि स्पष्ट जाणवणारी व्हायला लागली. लवकरच लक्षात आलं की, हा एक प्रकारचा ठिपका आहे. तो लांब लांब लांब लांब जायचा -- कोट्यावधी मैल - किल्येक प्रकाशवर्षं -- अगदी दिसेनासा होईपर्यंत. आणि मग पुन्हा जवळजवळ यायला लागायचा. जवळ येताना तो अधिकाधिक मोठा व्हायचा आणि अधिकाधिक तेजस्वी व्हायचा. शेवटी तर तो इतका जवळ यायचा आणि इतक्या प्रकर्षानं जवळ यायचा, की, मी त्या अवाढव्य तेजानं आंधळाच व्हायचो. कारण माझे डोळे आणि तो प्रकाश एकरूप होऊन जायचे. त्यामुळं मग मी काही पाहतो आहे असं मला वाटायचं नाही. नंतर मग मला वाटायचं की ते अंधत्वच होतं.

त्यामुळं एक फारच भीतीदायक कल्पना डोक्यात आली. जर आपली सगळीच इंद्रियं आपापल्या संवेदनांशी एकरूप झाली तर ? डोक्यावरचे केस हादरायला लागले. पायाखालची वाळू सरकायला लागली. टाळूवर तेल थापून स्वस्थ पडावंसं वाटायला लागलं.

आणि मग ऐन संकटाच्या वेळी कुणीतरी त्राता यावा तशी तिची आठवण झाली. विचारांच्या प्रत्येक टिचकीसरशी राख झडून ती फुलायला लागली. तिच्या रक्तरंगाच्या साडीवर एकच एक पांढर फूल होतं. मोठं. शुभ्र. आणि जणू आपल्या पाकळ्यांच्या कवेतूनच तिचा देह फुलायचा आहे अशी धारणा असलेलं. उरलेली लाल पार्श्वभूमीही भडक असली तरी किती नेटकी होती. तो रंग किंचित जरी बेशिस्त असता तर फूल रक्तबंबाळ झालं असतं. आणि मग तिला सगळं जग कुस्करून गेल्यासारखं वाटलं असतं. ती म्लान झाली असती. आणि एकटीच लांब लांब निघून गेली असली. पाठमोरी.

पण तिच्या आठवणीनं, एक प्रकारचा विसावा मिळाला. साल्या आहेत या गोष्टी अशाच आहेत म्हणून किती बरं आहे ! यातली प्रत्येक चीज जर अशी नसती तर हे सगळं काय काय होऊन बसलं असतं ।

इतकं झालं तरी प्रकाशाच्या ठिपक्याचं काय करायचं ते समजेना. तो नसता तर हे सगळं आणखी भयानक झालं असतं हे खरं. पण तो असल्यामुळं बरं काय होतंय ते कळेना. त्याच्याबद्दल नव्या नव्या गोष्टी ध्यानात येत होत्या आणि तरीही आपण कंप्लीट मूढ आहोत असं वाटत होतं. सर्वांत महत्त्वाची गोष्ट कळली ती ही की, त्या प्रकाशाला एक दिशाहीन अशी गती आहे. एक नुसती शुध्द गती. हे कसं शक्य आहे ? पण ते खोटंही म्हणता येईना. हवालदील होऊन मरायला टेकलो तरी ही परिस्थिती नाकारता येईना.

समजा एक कंप्लीट मोकळं आकाश आहे. अं ? आणि एक माणूस पॅरॅशूट घेऊन उतरतोय. या जगात बाकी काही नाही. पृथ्वी,ग्रह, तारे,आकाशगंगा वगैरे वगैरे काही नाही. ही कल्पना तुम्ही अशीच लढवत चला. आपण तुम्हाला गॅरंटी देतो -- याहून दुसरी कुठलीही विनोदी कल्पना कुठल्याही माणसाला कधीच करता येणार नाही. अक्षरशः हसून हसून तुमची बोबडी वळेल.

आणि अरे बापरे ! आपले कपडे आपोआप फाटत चाललेत असं वाटायला लागलं. हे म्हणजे भयानकच ! अब्रूचं एक ठीक आहे पण अब्रूनुकसानीची फिर्यादसुध्दा करायची सोय नाही ! कुणावर करणार ? भीतीनं कुडकुडायला लागलो. आपल्या अब्रूचं --म्हणजे आपल्या देहाचं -- दर्शन भर चव्हाट्यावर आरणि तेही गारठत चाललेल्या स्वरूपात होणार... अरे बाप रे...गोंधळून जायला लागलो. कपड्यांवर सगळीकडून भेगा सरकत टोकाकडे जात होत्या पुढे...पुढे...पुढे...पुढे.

पण गंमत अशी की, कुठलाच कपडा चिंध्या होऊन जमीनदोस्त झाला नाही. थोड्याच वेळात ही गंमत माझ्या ध्यानात आली आणि मी निभ्रांत झालो.

नाही तर म्हटलं च्यायला आपण या जगात एकदम दिगंबरच होऊन जायचे !

(सदर --हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर,मार्च १९७० )

# विचारांनी फार फार तर डोकं फिरू शकतं

मुळात म्हणजे खरोखरच आपली रूपं किती असतात ते सोडूनच द्या. आणि खरोखरच्या रूपांची बाहेर पटणारी ओळख ही खरोखरची नसतेच असंच म्हणावं लागेल. म्हणजे अनेक माणसांना पटणारी आपली रूपं -- म्हणजे ओळखता येणारी. शिवाय ती रूपं कशी असतील याबद्दलचे आपले अंदाज. म्हणजे हा सगळा गोंधळ शेवटी आपल्यातच सुरू होतो आणि आपल्यातच संपतो. किंवा संपत नाही.

असा पडता पडता थांबलेला एक अश्रू घ्या. त्या अश्रूत किती जणांना आपापले चेहरे निरखून जाता येईल ? किती जणांना आपापले भांग पाडता येतील ? आपल्याच रूपाच्या प्रेमात पडणारी माणसं खरोखरच ग्रेट. आपल्याच रूपाच्या तिरस्कारात पडणारीही. च्यायला तुमच्या गाढवांनो, तुम्ही आकाशातले तारेबिरे जरा बाजूला ठेवा -- आणि मग जो अंधार उरतो तो कधी तुम्ही बघितलाय का रे रुपड्यांनो ? तुम्ही म्हणाल की अंधाराला पंख नसतात. आमच्या डोळ्यांना पंख आहेत. आम्ही उडत जाणार. आता स्वतःच्याच तोंडानं तुम्ही,' आम्ही उडत जाणार ' म्हटल्यावर मी तरी काय म्हणणार ? जा उडत. पण खरं जर सांगायचं झालं, तर हे उडणंबिडणंच एक स्थिर साचा असतं. खरी गती असते ती त्या अंधारालाच. कारण, तुम्ही एक वेळ नसाल, पण तो असतोच.

आईनं मुलाला सांगितलं की मुला, फुलं कळ्या असताना तोडू नकोस. ती फुलल्यावर छान दिसतात. दुसऱ्या दिवशी मुलगा फुललेलं फूल तोडायला गेला. तर आई म्हणाली की बाळा, थोड्या वेळानं कोमेजून मरूनच जाणार आहे रे ते ! आत्ताच नको तोडूस. आणि ते फूल जेव्हा खरंच मेलं तेव्हा त्याच्या प्रेतयात्रेत उधळायचं काय असा मुलाला प्रश्न पडला. आता तो स्वतः मरायची वेळ आली तरी अजून तो प्रश्न सुटलेला नाही.

सांगायचा उद्देश, प्रश्न वगैरे शेवटी सगळं ठीक असतं. पण तो सुटला नाही तर एखाद्या निरपराध फुलाचं प्रेत उगीचच आयुष्यभर पडून राहतं. तुम्ही म्हणाल की रंग काय फक्त फुलानाच असतात ? आम्हाला विचारही करता येतो. बरोबर आहे. त्याचबरोबर तुम्हाला प्रश्नही पडू शकतात हेही खरं आहे. तुम्ही कितीही भिंतीवर डोकं आपटलं तरी फार फार तर तुम्हाला उत्तरं सुचू शकतात, पण प्रश्न सुटू शकत नाहीत. तुम्हाला-आम्हाला एखादा अश्रू ढाळायचाच असेल तर त्यासाठी ही जागा उत्तम आहे. न सुटण्याची अवस्था. ( पण या अवस्थेवर अश्रू ढाळणंही येडचापपणाच.)

क्ष आहे - शहाणा. छे, छे, क्ष कसला शहाणा ! उलट तो तर येडा आहे. बरं क्ष विव्दान आहे. त्यानं फार अभ्यास केलेला आहे. असं ? ह्यॅ,ह्यॅ. पण त्यानं ते सगळं ज्या ॲप्रोचनं केलंय ना ते फारच विचित्र वाटतं. अगदीच तोकडं. बरं ते असो. क्ष हा एक फार मोठा संशोधक आहे. व्हेरी गुड. माणूस उपयोगी पडतोय. एवढ्या मोठ्या अंधारात त्याचाही उपयोग होऊन जातोय ही फार चांगली गोष्ट आहे. शिवाय देशाचं नाव रोशन होतं ती गोष्ट वेगळीच.

तर हे असं आहे. विचारांचे उपयोग वगैरे आहेतच. पण विचाराचं दुसरं एक म्हणजे त्यांनी फार फार तर तुमचं डोकं फिरू शकतं. बाकी काही नाही.

तुम्ही नुसतं एक वेडा बोलतोय असं नका पाहू. कारण मीच तुम्हाला एखादं सत्य किंवा सत्य असू शकेल असं काही सांगून जाण्याची शक्यता आहे. आणि दुसरं एक म्हणजे नेमबाजीचे नेम वस्तूंवर लागू शकतात. वस्तूंपलीकडचे नेम लावायला वेडी माणसंच कधी कधी शकू शकतात. तर मी शकू शकण्याची शक्यता आहे एवढं तरी समजून असा.

तर शेवटी एक गोष्ट सांगतोच. एक फुलाची सांगितली. दुसरी ही.

एक होती वेश्या. पक्की भरलेली. ओरबाडून खावी अशी. तिच्या आयुष्यात खूप खूप खूप खूप माणसं येऊन गेली. आयुष्यात ती खूप खूप खूप खूप हसली.

इतकं असूनही तिला जेव्हा मृत्यूचा स्पर्श कळला तेव्हा एक गोष्ट तिच्या लक्षात आली. आयुष्यात खोटेपणाचा स्पर्शही न झाल्याची शांतता आपल्याला होऊ शकते.

सारांश काय, तर हे नवजात बालकांनो, शेवटी तो अंधार खरा आहे.

विचारबिचार कसले करता ?

(सदर-- हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर,एप्रिल १९७०)

**केल्याने होत आहे रे**
**आधी केलेचि पाहिजे**

## पेर

-- मी.

आहे की नाही अवतरण ? माझंच. पहिलं भले असेल ख्रिस्ताचं किंवा बुध्दाचं. पण आम्ही आमचा एक दणक्या शब्द टाकून त्या सगळ्या अर्थाची परिमाणंच वाढवून टाकलीयत, हजारोंनी. दुसरे कुणी लेखक वगैरे या जगात होऊन गेले ही काय इतक्या महत्त्वाची गोष्ट आहे का की स्वतःच्या ऐवजी त्यांच्या अवतरणांनी आपलं लिखाण सुरू करावं ? अवतरणच पाहिजे असेल तर ते स्वतःचंच पाहिजे. तुमच्या पूर्वीच्या कुठल्या लिखाणात तसं काही नसेल तर आता लिहा. अवतरणं लिहिणं हे तुम्ही समजता तितकं कठीण नसतं. पण अवतरणं लिहिण्याइतकं महत्त्वाचंही दुसरं काहीच असू शकत नाही हेही खरंच आहे.

मी काय म्हणतो की, हे आख्खंच्या आख्खं विश्व व्यापण्याचा प्रत्येकानं प्रयत्न केला पाहिजे. पेर या शब्दाचा काही नेहमी अश्लीलच अर्थ केला पाहिजे असं नाही. ऊसालाही पेरं असतात आणि बोटांनाही.. पण एकूणच याही गोष्टींची मुळं कुठंतरी अश्लीलच असतात हेही कदाचित आपल्याला पटून जाऊ शकेल. एका ठिकाणी उभ्या असलेल्या झाडाची पडकी पानंसुध्दा कशी भरारा भरारा धावत असतात दाही दिशांना. तसं विखरून, पसरून जायला हवं प्रत्येकानं विश्वभर. नुसतं एकलकोंडेपणानं घरात बसण्यात काय अर्थ आहे ? घर काय काहीही झालं तरी घरच. ते काही कधीच विश्व होऊ शकणार नाही. ' घर अमुचे आकाश ' याचा अर्थ तुम्ही घर हेच आमचं आकाश आहे असा लावणार की आकाश हेच आमचं घर आहे असा लावणार की घर आम्हाला आकाशाइतकं अनंत वाटतं--की आकाश आम्हाला घराइतकं थिटं वाटतं ? सगळ्यांचं  उत्तर एकच. घर अमुचे आकाश. वाचा आणि गप्प बसा. अर्थ कसला विचारता रे मुलांनो?

गाढवांनो, आपण जिवंत आहोत याला तरी काय निश्चित अर्थ आहे ? पण तरीही आहोत ना आपण जिवंत ? मग ? बरं तर मग अर्थ विचारायचा नाही एवढं ठरलं. झालं की मग ! हेच सांगत होतो मी ! आहोत ना आपण हयात तर जावं की वाढत. भरारत. फोफावत. मोठं मोठं होत. व्यापत सगळं काही. हे. ते. इकडचं.तिकडचं. आता मग 'मोठंच कशाला व्हायचं ', ' वाढायचंच कशाला ',' पसरायचंच कशाला ' हे प्रश्न आहेत. मग काय लहान लहान लहान लहान होत जायचं ? एक तर ते शक्यही नाही आणि दुसरं म्हणजे ते म्हणजे त्यामुळं शेवटी अगदी म्हणजे खलासच होऊन जाण्याची भीती आहे. तर मग त्यापेक्षा आपलं पसरावं.

आता अरबी समुद्रच घ्या. या समुद्राला तुम्ही एखाद्या किनाऱ्यावर पदस्पर्श करा आणि करा कल्पना केवढ्या प्रचंड गोष्टीला तुमचा स्पर्श झाला आहे ! किंवा आपलं थुंकूनच ठेवायचं एकदा समुद्रात. आख्खं जग तुमचं उष्टं पाणी पितंय ! पावसातनं तरी काय तेच येणार नं पाणी ! अलेक्झांडर ! खंडाळ्याच्या घाटातनं निघालीय ना गाडी, चारदोन चारदोन ठिकाणी थुंकायचंच. की तो परिसर गेला बघा भारून तुमच्या अस्तित्वानं. कुठं हा दगड उचलून तिकडं टाकायचा, कुठं तिकडचा धोंडा इकडच्या दरीत टाकायचा -- असं करत राह्यचं. थोड्याच दिवसांत तुमच्या लक्षात येईल की च्यायला बसल्या बसल्या नुसते परिसर आठवत गेलं तरी आपण कसले अवाढव्य, प्रचंड, थोर आहोत !

त्यात तुम्हाला थोडी वाचनाची आणि स्टडी करायची हॅबीट पाहिजे. नसली तरी ती हळूहळू कल्टिव्हेट करता येते. सार्त्र, काफ्का, कामू, गिद, मर्ढेकर, आयनेस्को, आपटे, रेणू, प्रीतम, फडके, टॉलस्टॉय, लॉरेन्स बेंकेट, चित्रे, नंदा, न्यूटन, फ्रॉईड, हेगेल, बेडेकर, हा इझम, तो इझम, विश्वाची उत्पत्ती, नीरो का मीरो त्याची चित्रं ....भयंकर प्रचंड ! हे सगळं सगळं सगळं सगळं आपणच ! या सगळ्यांना आपले स्पर्श ! किंवा आपल्या स्पर्शाना या सगळ्यांचे स्पर्श ! जस्ट इमॅजिन !

आता प्रश्न असा येईल की, हे सगळं ठीक हो पण कष्ट किती ! थुंकून थुंकून तिच्या मारी आम्ही अगदी कोरडे पडून जायचो शेवटी ! इतकं करून पुन्हा आम्ही ' टी इन स्पेसशिप ' ही कविता वाचलेली नसणारच ! आणि आम्ही मिळवलेल्या गोष्टींची आम्ही न मिळवलेल्या गोष्टींच्या प्रमाणाशी तुलना होणारच ! म्हणजे परत आम्ही चाललो होत लहान लहान लहान लहान.

तर जे अस्तित्व तुलनेवर अवलंबून नाही असं काही असू शकेल काय ?

**पेर**

-- मी.

(सदर -- हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर, मे १९७० )

# या टेबलाला अंत आहे

सालं कुणालाच स्वतःपेक्षा मोठं होता येत नाही. मुंगी स्वतःपेक्षा मोठी व्हायला लागली तर तिचा एक तुकडा स्वर्गात आणि दूसरा पृथ्वीवरच राहिला. बेडूक स्वतःपेक्षा तसाच व्हायला लागला तर बैल होण्यापूर्वीच फुटून जमिनीवर पाण्यासारखा पसरला. बैलाचं तेच. हत्तीचं तेच. आणि हत्तीचा बाप जो कुणी होता किंवा कुणी असेल तो --त्याचं तेच. तर स्वतःपेक्षा मोठं म्हणजे स्वतः जेवढं मोठं होण्याची शक्यता आहे त्याहून मोठं -- हा अर्थ तुम्ही ओळखला असेलच. म्हणजे स्वतःला जेवढं मोठं होता येतं त्याहून अधिक मोठं होता येत नाही. तुम्ही म्हणाल की, च्यायला काय पण कन्क्ल्यूजन काढलाय ! वा !

एक टेबल घ्या. त्याच्यावर चढा. ओ ऽ, उतरा खाली. चढले आपले चढा म्हटल्यावर. तुम्हाला वरचं काही काढायचं नसूनही टेबलावर चढता म्हणजे कमालाय । आणि माझं काय इतकं ऐकायला पायजेल असं नाय् ! अहो येडा ना मी ! तरी पण मूर्खांनो, उतरा म्हटल्यावर उतरलात ! हत्तेरी ! आता थांबा. मी चढा म्हणतो आणि तुम्ही न चढता तसेच उभे राहा म्हणजे माझी अवज्ञा केल्याचं शहाणपण तुमच्या पदरात पडेल. चढा. वाटलंच ! मी माझं ऐकू नका म्हटल्यावर तुम्ही ऐकणार नाहीच माझं ! तुम्ही नुसते शहाणे उंदीर आहात. बुद्दू कुठले ! माझ्यासारखी येडी मांजरंसुध्दा तुम्हाला तुमच्या 'मधुचंद्रा 'सकट गट्ट करू शकतील !

ते असू दे. हे टेबल संपलं कुठं ते दाखवू शकाल ? असल्या फालतू प्रश्नांची उत्तरं देत बसायला तुम्हाला वेळ नसेलच. तरीपण या प्रश्नाचा तुम्ही कालबाह्य विचार केलात तरी चालेल. किंवा असमकालीन किंवा विषमकालीन. हे टेबल अनंत आहे असं काही तुम्हाला म्हणता येणार नाही. कारण मग ते तुमच्यात--माझ्यात सगळीकडे असावं लागेल. शिवाय विकृतींनी ग्रासलेली तुमच्यासारखी माणसं त्याच्यावर चढूही शकतात. सारांश, या टेबलाला अंत आहे हे एकदा ठरलं, की त्याला तो असणारच अस कबूल केल्यासारखंच आहे. म्हणजे थोडक्यात काय, तर आधी याला अंत आहे हे कबूल करा.

आता आणखी आणखी लाकडं, फळ्या वगैरे वगैरे आणून जोडाजोडी करून हे टेबल तुम्ही मोठं करू शकाल. त्याला पॉलिश करू शकाल. वर फुलांच्या कापडानं मढवू शकाल. पण हे टेबल तुमच्या घराजवळच्या नारळाच्या झाडाहून वर नेलं तरी ते कुठंतरी संपणारच. सारांश काय तर प्रत्येक वस्तूच्या कडांजवळ -- कडांशी ती ती वस्तू संपत असते.

एवढं झाल्यानंतर आपण आता टेबलावरून उतरू या. आता सांगा, तुमच्या कडा कुठायत ? हत्तेरी ! एवढं लाजायचं काय कारण ! तुमच्या शरीराच्या प्रत्येक शेवटच्या बिंदूजवळ तुम्ही संपता. कुठे कडे असतील, कुठे दऱ्या असतील आणि कडे दऱ्यांमध्ये कोसळूही शकतील. ते सोडा. त्या त्या गोष्टींना शेवटच्या रेषा आहेत हे महत्त्वाचं.

तुम्ही म्हणाल, कशाला डोकं खाताय ! एखाद्या वस्तूला एखादी वस्तू म्हणत असताना त्या तेवढ्याच वस्तूला आम्ही ती वस्तू म्हणत असतो एवढं का आम्हाला कळत नाही ? शाबास,शाबास,शाबास !

तुमच्या किंवा दुसऱ्याच्या शरीराच्या अंतर्बाह्य कडा तुम्हाला कळतात किंवा कळू शकतात किंवा कळू शकतील असं आपण समजू. आता तुमचं मन घ्या. तुमचे विचार घ्या. तुमची एखादी भावना घ्या. शकता पाहू यांच्या कडा ? -- यांचे शेवट ? आता नाही म्हणू नका. आणि नुसतं नाही म्हणून स्वतः अनंत आहोत असं दाखवण्याचा वांझ प्रयत्नही करू नका. आता तुम्ही म्हणाल, असतील याही गोष्टींचे हे हे शेवट ! पुढे ?

विचारलात हा प्रश्न ! गाफीलपणे तुम्हाला नको तो प्रश्न विचारलात. आता तुम्ही मांजरच्या तोंडाशी आलेले आहात.

आपण स्वतः हे जर फक्त आपण स्वतःच असू शकणार असलो तर मग शेवटी हे सगळं आहेच काय ? म्हणजे आपण स्वतः हे आपण स्वतः असायची गरजच काय ? -- हा आमचा प्रश्न हेच तुमच्या प्रश्नाचं उत्तर. बोला !

( सदर -- हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर,जून १९७० )

# भाले आणि भोकं

तुम्हाला या जगातली एक अत्यंत महान चीज माहिती आहे का ? बहुतेक माहिती असेलच असा माझा अंदाज आहे. कारण स्वतःच्या आयुष्याची मौल्यवान किंमत ओळखणाऱ्या प्रत्येकाला ती माहीत असतेच. एवढ्या प्रभावी अशा आभाळाखाली सुध्दा जेव्हा आपण आपलं महत्त्व मानायची कुवत दाखवू शकतो तेव्हा आपण किमान एका प्रमाणात ती गोष्टी स्वीकारलेली असतेच.

एखादा जीव तडफडून मरताना तुम्ही पाहिलाय की नाही ? माणसाच्या अंगांगावर भाले खुपसले की त्याहून दे धमाल मजा येतो. भाले खुपसायचे म्हणजे खरोखरच भाले खुपसावे लागतात असं नाही. नुसतं लंगड्याला लंगडा म्हटलं तरी तुमचा भाला खुपसण्याहून खूपच प्रचंड आनंद तुम्हाला मिळू शकतो. माणसांची वैगुण्यं टोकरली की, माणसं भयानक घायाळ होतात हा या दुनियेतला फार सोपा असा करमणूकप्रधान खेळ आहे. याला फक्त दोनच गोष्टी लागतात. एक म्हणजे वैगुण्यावाली माणसं आणि दुसरं म्हणजे त्या भडक क्रूर तंद्रीत जायची मनाची कुवत. पहिलं काहीच कठीण नाही. कारण प्रत्येक व्यक्तीला कुठे ना कुठे भोकं असतातच. दुसरी जरा कठीण गोष्ट आहे. पण थोड्याफार प्रयत्नानं ती जमू शकते.

हे जर तुम्हाला जमलं तर थोड्याच दिवसांत तुमच्या लक्षात येतं की, तुम्ही फार भयंकर असं विषारी काटऱ्यांचं जंगल आहात. कुणावर ओरखडे उठतायत. कुणी रक्तबंबाळ होतंय. कुणी खून करतायत आणि कुणी आत्महत्या...बस्स ! नंतर आपण नुसतं बघत राह्यचं.

तुम्ही आम्हाला म्हणाल की ग्रेट आहात. सगळेच असे काटऱ्याकुटऱ्यांनी बहरले तर मग सगळेच रक्तबंबाळ होऊन जातील की ! मी म्हणतो, हीही शक्यता एक वेळ गृहीत धरू. त्याच्याहून जास्त दुसऱ्याला घायाळ करायचं. त्याच्याहून जास्त तिसऱ्याचं रक्त भिजवायचं. नुसत्या नवीनच नव्हे तर नव्या नव्या ईर्षांनी करायच्या या गोष्टी आहेत. त्यांच्याशिवाय ते जमणारच नाही.

आणि यातून मग हळूहळू तुमच्या डोक्याला, चेहऱ्याला एक छानपैकी सैतानी हडळीसारखा आकार येत जाईल. द मोस्ट मार्व्हलस थिंग ! टेरर ! मग कमकुवत जनता सरळ सरळ तुम्हाला घाबरायला लागणार. एक तर तुम्हाला शरण येणार नाही तर दूर तरी पळणार. अनभिषिक्त सम्राट ! नंतर मग इंग्रज सेनापती नजराना घेऊन उभा !

मीसुध्दा जिला मानतो अशा एका बाईनं या क्षेत्रात केलेली प्रगती तुम्हाला सांगतो. हा वशिलेबाजीचा किंवा एखाद्याची प्रशंसा करण्याचा प्रकार अर्थातच नाही. या सगळ्या प्रकाराचा उत्तरार्ध असा असतो, की तुमच्या स्वतःच्या आयुष्यातही खूप काटेकुटे आणि निवडुंग फुलून येतात. कॅन्सरसारख्या या गोष्टी दूरवर पसरतात. तुमचे कुठलेही संबंध असे कडक, रुक्ष आणि सारख्या फुटणाऱ्या फोडांसारखे ताजे ताजे राह्यला लागतात. तसं म्हटलं तर ही एक समाधीसारखी अवस्था. कमकुवत जनता अर्थातच याला वेड म्हणते. आणि तरीही या गोष्टींनी ती घायाळ होत राहतेच. हेच आपलं एक अटळ आणि अपरिहार्य कर्तृत्व ! आणि हीच आपल्या प्रलयंकर अस्तित्वाची ठाम निशाणी ! आज ही बाई कुठंही भोक दिसलं की अगदी सहजी आपलं जहाल निशाण तिथं खुपसून ठेवू शकते ! तिचं स्वतःचं आयुष्य तर तिनं एव्हर ताजं ठेवलेलं आहेच ! तिला प्रणाम !

इतकं करूनही शेवटी तिच्यायला काय होणार आहे ?-- असा एक गाढव शहाणा सवाल तुम्ही विचारणारच. मग आम्ही म्हणू की तुम्ही स्वतःचं आयुष्य तसं फुलवून बघा, त्या समाधीचा अनुभव घ्या, आणि मग बोला. एरवी काय तुम्ही एक तर अज्ञानी आहात किंवा भित्रे आहात एवढंच म्हणता येईल.

( सदर -- हिप हिप हुर्रे ऽ --मनोहर,जुलै १९७० )

# अपूर्णविराम

ची कटकट ! तुम्ही म्हणाल, अपूर्णविराम कसला ? हे असलं वाचून जे काय डोक्यात थोडंफार असेल तेही व्याकरण विसरून जायचं ! म्हणजे नसलेलं व्याकरण लक्षात आणि असलेलं विसरलेलं ! -- असं व्हायचं !

मोठ्या मेटाकुटीनं संपादक महाशयांनी आमचे हे वेडे चाळे चालवायला एक पान दिलं आणि आता त्यांना आणि वाचकांना सगळ्यांनाच वेड लागायची पाळी आली तेव्हा ते म्हणायला लागलेत की आता हे अजून किती चालवायचं ? नाही तरी सदर थांबवायचा आमच्या डोक्यातला बिंदू हाच होता. पण शहाण्यांची सदरं पूर्णविरामांनी संपतात तर आमचंही आमच्या रीतीनं जाऊ द्या. म्हणून हा अपूर्णविराम...

तुम्ही म्हणाल की, आता ही धुळवड आणि हुर्रेवडी संपवताय तर फुलस्टॉप देऊन टाका की ! अपूर्णविरामाचा आणखी ताप कशाला ? तर मंडळी, यावर आम्ही एकच सांगतो. आम्ही आमच्या सर्वस्वानं मोकळे आहोत. मुक्त म्हटलंत तरी चालेल. आता मुक्त तरी का, तर आम्ही जातिवंत वेडे आहोत म्हणून ! आणि आम्ही वेडे तरी का, तर पूर्णविरामाच्या कचाट्यातून आम्ही सुटून गेलेले आहोत म्हणून ! पूर्णविरामांची ओझी वागवणारी तुमच्यासारखी माणसं आम्हाला वेडे म्हणणार नाहीत तर काय म्हणणार ? यावर तुम्ही म्हणाल की, हे सगळं बंडल आहे. तुमची आजपर्यंतची दहाबारा पानं घेऊन आयुष्यभर आम्ही त्याची पारायणं करत राहावं म्हणून तुम्ही ही सगळी बकवास करताय ! अपूर्णविराम वगैरे खुळचटपणा बंद करा आणि पूर्णविराम देऊन मोकळे व्हा !

पण पूर्णविराम देऊन मोकळं होता येत नाही हीच तर आमची अडचण आहे. तुमचं डोकं उघडून बघा. एकजात सगळ्या गलिच्छ गोष्टींचं मूळ कारण आहे हा पूर्णविरामाचा हव्यास. तुमच्या सगळ्या दडपणांचं मूळ कारण हा
पूर्णविरामाचा शोध ! मंडळी, भावनांनी किंवा विचारांनी निर्णय लागतात पण घर्षणं मिटत नाहीत. प्रत्येकाच्या आयुष्याची काही ना काही शिस्त ! काही ना काही पध्दत ! यात सातत्याचा भास मिळतो पण त्याचबरोबर संपण्याची भीतीही येते. पूर्णविरामात पूर्णविरामाचं उपरं सुख असतं त्याचबरोबर त्यात त्याचीच भीतीही असते. कारण ज्यासाठी आयुष्यात पूर्णविराम स्वीकारायचे त्याचीच त्यांच्यात शाश्वती नसते.

तुम्ही म्हणणार की ते सगळं ठीक आहे. या अंकात, हे सदर संपतंय ना ? पुन्हा आता कटकट वटवट नाही ना वाचावी लागणार ? मग ठीक आहे. च्या मारी नसती कटकट एकेक !

तर हे तुमचं बरोबर ! आमचा तुम्हाला किमान काही तरी त्रास होत असणार याची आम्हाला कल्पना होतीच. अहो, वेडा कधी कुणाला स्वस्थ राहू देईल काय ? पण आम्ही काय म्हणतो की आम्ही तुम्हाला त्रास दिला असला, बोअर केलं असलं, डोकं फिरवलं असलं तर आम्हाला खुल्या दिलानं मुआफ करून टाका. वेडा म्हणून सोडून द्या.

आता काहीजण असं म्हणतील की, स्वतःच्या वेडेपणात आमची डोकी फिरवण्याइतकी ताकद आहे असं तुम्ही समजता काय ? हा म्हणजे तुमच्या वेडाचा कहरच झाला.

मग ठीक आहे. आमच्या वेडापेक्षा त्या फिक्स्ड् डोक्यांची पॉवर जास्त ठरली असं आम्ही मान्य करून टाकू. कारण आम्ही पहिल्याच लेखात सांगितल्याप्रमाणे कुणाचाच पराभव करायची आमची इच्छा नाही. अगदी एखाद्या शहाण्याचासुध्दा !

जय-पराजयाची भाषा काढाल तर पराजय पत्करून तुम्हाला हवा असलेला पूर्णविराम द्यायला आम्ही केव्हाही तयार आहोत. कारण आम्ही आमच्या आयुष्यातला पूर्णविरामच कधी ना कधी उखडून टाकलेला आहे.

तर हे सदर संपवताना थोडं काही बरं असं बोलायचं झालं ( बोलून काही होत नसतं म्हणा ) तर एवढंच -- या सदराबरोबरच तुमचे पूर्णविरामही संपोत आणि तुमच्यात त्या अनादी, अनंत अपूर्णविरामाला प्रवेश मिळो.

कारण अपूर्णविरामात निर्णयही आहेत आणि मुक्तीही आहे !

मुक्ती - एक थोतांड ! मुक्ती -- एक गांडूपणा ! मुक्ती -- एक भ्याडपणा !

मुक्ती, मुक्ती हिप हिप हूर्रे !

मुक्ती, मुक्ती, हिप हिप हुर्रे !

हिप हिप हूर्रे, हिप हिप हूर्रे !

हिप हिप हिप हिप रे ऽ हिप हिप हूर्रे ....

( सदर -- हिप हिप हुर्रे ऽ -- मनोहर, ऑगस्ट १९७० )

# मद्रासचे सुपरिंटेंडेंट

चेहरा करडा. फारच क्वचित् हसायचे. हसले तरी ते एखाद्या विनोदावर हसलेत किंवा आनंदी आहेत म्हणून हसलेत किंवा त्यांना मजा वाटतीय असं वाटायचं नाही. इतरत्र कुठं त्यांचं नाव निघालं तर त्यांचा हसरा, आनंदी चेहरा कुणाच्याही डोक्यात आला नसता.

ते स्वतः म्हणायचे की मी माझ्या माणसांवर रागावत असलो, संतापत असलो तरी माझं तितकंच त्यांच्यावर प्रेमही आहे. तेही तसं खरं होतं. एकदा एक मेंबर दहा मिनिटं उशिरा आला. वडील हॉस्पिटलमध्ये असल्यामुळं त्याला उशीर झालाय हे कळल्यावर त्यांनी त्याला हे कारण असेपर्यंत कितीही उशीर झाला तरी चालेल अशी ब्लँकेट परमिशन दिली होती. अशी उदाहरणं घडत असल्यामुळं लोकही त्यांच्या दराऱ्याला मान देत. त्यांनी आपली पॉवर वापरून तसं कुणाचं वाईट केलं नव्हतं आणि तरीही लोक त्यांच्या दराऱ्याचा मान ठेवत. चारचौघांनी अचानक त्यांच्यावर आरडाओरडा सुरू केला असता तर कदाचित् ते घाबरले असते पण अशी ट्रायल न घेता त्यांना मान देत राह्यचं असंच लोकांनी आपोआप मनोमन ठरवलेलं होतं. अशा प्रसंगी ते न घाबरण्याचीही शक्यता होती. मग ते सगळं वाढत गेलं असतं आणि त्यांना नामोहरम करणं किंवा त्यांचा नाश करणं असं काहीतरी करावं लागलं असतं. एवढं काही व्हावं अशी कुणाचीच इच्छा नव्हती. त्यामुळं ते करडेपणानं वागत आणि लोक घाबरून मान देत राहात. माझ्या संस्थेत मला बेशिस्त अजिबात चालणार नाही असं ते म्हणत. बेशिस्तीविरुध्दच्या लढाईत मी कोणतीही किंमत मोजायला तयार आहे असंही ते म्हणत. हे म्हणताना ते इतके आत्मविश्वासानं आणि निग्रहानं भरलेले असायचे की ते पूर्णपणे खरं वाटायचं. लोक ते खरं धरून त्यांना मान देत.

पण तरीही त्यांना मान देत राहण्याचं एक प्रेशर लोकांच्या मनांवर राही. त्यामुळं तसे ते मनापासून कुणाला आवडत नसत. चिडून एखादा माणूस म्हणायचा की यांच्या बायकोपोरांनाही जगणं मुष्कील करत असेल हा. शिस्तसुध्दा फार होऊन तिचा कंटाळा येऊन काय उपयोग-- असंही एखादा म्हणे. ही साली बाहेरून लादलेली शिस्त आहे-- शिस्त अशी आतून फुलवता आली पाहिजे -- सहज -- असंही एखादा म्हणे. लोक बेशिस्त वागले तर आपली नाचक्की होईल, आपण फेल्युअर ठरू याला घाबरतो भडवा आणि आपल्याला टेन्शनमध्ये ठेवतो -- अशी पुस्ती एखादा जोडे. ते समोर आले की आपसूक मान देण्याची प्रथा चालू राही.

त्यांनी एखादा मॅनेजमेंटचा कोर्स घेऊन हा ॲप्रोच ठरवला होता असं काही नव्हतं. त्यांच्या स्वभावानं ठरवलेल्या या ॲडजेस्टमेंट्स् होत्या. आपोआपच आपल्या आणि इतरांच्या मनांची घडी त्यांनी अशी बसवली होती. त्यांचे वरिष्ठ जर का कधी आले तर ते या घडीशी सुसंगत असे त्यांच्याशी अदबीनं वागत, किंचित हसून बोलत. ते त्यांच्या वरिष्ठांना घाबरतात हे पाहून इतरांना बरं वाटे. याचा परिणाम म्हणजे उलट इतरांनी त्यांना घाबरून मान देण्याची पध्दत घट्ट होई. माणसानं एक तत्त्वज्ञान स्वीकारलं की तो कसा सुसंगत वागतो याचं ते एक मूर्तिमंत उदाहरण होते.

त्यांचं नाव तसं अवघड होतं. इतर ऑफिसेसमधले लोक वगैरे त्यांना मद्रासचे सुपरिंटेंडेंट असंच म्हणत. किंवा नुसतं मद्रासी म्हणत. कधीकधी लोक म्हणायचे इकडं कशाला आला हा - जा म्हणावं तिकडं. विशेष म्हणजे या गर्दीत त्यांचे काही हेर असायचे. म्हणजे चमचे. सगळी बित्तंबातमी त्यांना समजायची. एखादा फारच विरोधी बोलतोय वगैरे असं काही कळलं तर त्याच्यावर ते जास्त करडी नजर ठेवायचे. हे लक्षात आलं की तो माणूस हळूहळू मऊ पडायचा. कुठूनही येऊन कुठल्याही लोकांना मापात ठेवायची कला त्यांना अवगत होती.

एक चांगले प्रशासक म्हणून त्यांचा लौकिक होता. त्यांचे वरिष्ठही त्यांना मान देतात असंही चित्र कधीकधी दिसे. वरच्या लोकांचा याला पाठिंबा आहे -- याच्या जास्त नादी लागण्यांत अर्थ नाही -- असंही त्यामुळं काहींच्या मनांत येई.

एका मोक्याच्या क्षणी, लहान मुलाचा आविर्भाव चेहऱ्यावर आणून एकानं त्यांना विचारलं की सर, तुम्हाला जगणं आनंदाचं वाटतं का ? तर ते म्हणाले की तुमच्या बरोबरचा माझा इथला काळ खरंच आनंदात गेला, तुमचं प्रेम आणि सहकार्य मी कधीच विसरणार नाही. लोक मनात म्हणाले, की झक मारत आम्हाला सहकार्य द्यावंच लागतंय. काहींनी ओळखलं की साल्यानं खरं उत्तर दिलेलं नाही. या रचनेबाहेरच्या प्रश्नाला त्यानं रचनेतलंच उत्तर दिलेलं आहे. यानंसुध्दा ती रचनाच घट्ट व्हायला मदत होणार आहे.

*****

# इलाज

घरात पत्र पडलेलं पाहून मी चकित झालो. पत्र ? कसं काय ? माझा पत्ताच जर माहीत नाही कुणाला तर पत्र येईलच कसं ? पण आलं होतं. मला नकळत माझा पत्ता कुणाकडे तरी गेला असणार. माझ्या इच्छेविरुध्द मिळालेला पत्ता वापरून कुणीतरी ते मला पाठवलं असणार.

की चुकून दुसऱ्याचं पत्र टाकलं गेलंय ? नाव वाचलं. माझंच होतं. पत्ताही बरोबर होता. क्षणभर थांबलो. आता मात्र मला त्या पत्र लिहिणाऱ्याचा पराभव करावा लागणार. कुणाचं आहे बघायचंच नाही. फोडून वाचायच्या आधीच फाडून फेकून द्यायचं. असंच करणं योग्य होतं. म्हणजे एवढा खटाटोप करूनही काही उपयोग होत नाही आणि हा माणूस पत्र न मिळाल्यासारखाच राहू शकतो हे त्याला कळलं असतं. जो जो असा प्रयत्न करेल त्याला त्याला हेच कळणं आवश्यक होतं. मला कुणी पत्र पाठवू शकत नाही हे सतत खरं राहणं आवश्यक होतं. हीच तर मी नेहमी काळजी घेतो.

आणि त्याला तरी एवढं काय पडलंय ? नकोय मला पत्र. कशाला पाठवायचं ? कशाला संपर्क वाढवायचे ? मला नकोयत तर ? पण त्यांना हवेयत त्याचं काय ? हेही यायचं लक्षात. पण जा नं, संपर्क हवे असलेले दुसरे पुष्कळ आहेत. पाठवत बसा एकमेकांना पत्रं. मला का ताप ? पण त्याला माझीच दया आली आणि मलाच पत्र पाठवावंसं वाटलं तर काय ? दयेसारखी शिक्षा नाही. मला स्वतःला माझी अवस्था केविलवाणी वाटत नाही. माझी काळजी घ्यायची तुमची जबाबदारी आहे असंही समजू नका.

कुठं ॲक्सिडेंट झाला मला तर कुणीतरी उचलून हॉस्पिटलमध्ये घेऊन जाईल हे मला मान्य आहे. मदत नाकारायचीय असं नाही. पण गरज नसलेली मदत कशाला ? मला याची गरज नाही. किंबहुना मला हे आवडतच नाही हे त्यांना कळत नसेल. जो तो आपल्या स्वतःच्या आवडीनिवडी लक्षात घेऊन दुसऱ्याशी वागतो. दुसऱ्याचं काही वेगळं असू शकेल ही साधी शंकाही त्यांना येत नाही.

मित्र हा प्रकार एक मला आवडत नाही. मला मित्र नाहीत. मी लग्नही केलेलं नाही. घरी एकटाच असतो. याचा अर्थ मी माणूसघाणा आहे असा नाही. लागल्यास दुसऱ्यांना मदत करायला मी तयार असतो. फक्त एकाच प्रकारची मदत करणं मला जमत नाही. ती म्हणजे एखाद्याला एकटेपणा किंवा रिकामा वेळ खायला येतो म्हणून त्याच्याबरोबर वेळ घालवणं. असल्या कमकुवत, भिकारडया माणसांची मला चीड येते. तुमच्या जगण्याला सारखे दुसऱ्यांचे टेकू का लागतात तुम्हाला ? मी याला प्रोत्साहन देणार नाही. जाम बोअर झालोय असं म्हणणारा माणूस मला अत्यंत तिरस्करणीय वाटतो.

माझ्या घराच्या अवतीभवती झाडं, वेली काही नाहीत. घरात चिमण्याही येत नाहीत. उजेडही कमीच असतो. गरजेपुरत्या वस्तू इकडेतिकडे असतात. आणि सिगरेट्‌स्‌. काही लोकांना जसं चारचौघात सुरक्षित वाटतं तसं मला एकटेपणात सुरक्षित वाटतं. डिस्टर्बिंग घटना मला आवडत नाहीत. उदाहरणार्थ पत्र येणं किंवा कुणी येऊन बोलत बसणं. माझ्या चेहऱ्याला सतत गंभीर राह्यची, सवय झालीय. माझ्याकडे बघूनच लोकांना कळतं की याच्या फारसं नादी लागण्यात अर्थ नाही. फक्त काही लोकांना हे कळत नाही. किंवा काही लोकांना माझी दया येत असेल. आणि माझी अशी दया वाटण्यात त्यांना सुरक्षित वाटत असेल. पण त्यांच्या सुरक्षितपणासाठी माझ्या सुरक्षितपणाचा बळी जातो. मग मी चिडतो. त्यांना आश्चर्य वाटतं. आपण याच्याशी चांगलं आपुलकीनं वागायला गेलो तरी हा तिरसटपणे वागला असं त्यांना वाटतं. उडत गेलं. खरं काय असतं ते मला माहीत असतं.

पत्र आलंच तर ते वाचायच्या आधीच मी फाडून टाकतो. ते कपटेसुध्दा लगेच उचलून टाकावेत हेसुध्दा महत्त्व त्यांना द्यावंसं मला वाटत नाही. आठाठ दिवस पडलेले असतात.

याचा अर्थ मला जगायला आवडत नाही असं नाही. उलट एकटं जगायला मला आवडतं. काहींना जसा मधूनमधून एकटेपणा खायला येतो तसेच मधूमनमधून मला संपर्क खायला येतात. पण इलाज नसतो.

आता संपर्क तर टाळता येत नाहीत आणि ते तर खायला येतात हा माझा एक प्रॉब्लेम आहे. याच्यावर एकटेपणाचा हमखास इलाज मला माहीत आहे पण हेही काहीकाही वेळी लगेच शक्य होत नाही. म्हणजे दुसऱ्या एका प्रकारे मीही कमकुवत आणि तिरस्करणीयच आहे. इतरांसारखाच.

ज्या ज्या प्रश्नांना उत्तरं आहेत किंवा इलाज आहेत ते सगळे प्रश्न माणसाचा कमकुवतपणा आणि तिरस्करणीयताच दाखवतात. मग इलाज माहीत नाही-- तो शोधता येणार नाही असा प्रश्न कुठला ? माहीत नाही.

*****

# दर्द

विषय फार मोठा आहे. आणि आपल्याला थोडक्यात आवरायचंय. फार विव्दत्ता वगैरे दाखवायची नाहीय. कारण ती नाहीच आहे.

पंढरपूरला विठ्ठलाच्या दर्शनाला गेलो होतो. दुपारची साडेबाराएकची वेळ. पादत्राणं अर्थातच ते म्हणाले राहू द्या इथंच म्हणजे तिथंच . आत कसेबसे गेलो. दर्शन झालं. ते ठीक झालं. पण येताना माती, वाळू, दगड असे भयानक तापलेले आणि त्यांच्यावरनं इतकं अंतर चालायचं. वाटेत कुठं पायांना या आगीतनं क्षणभर बाहेर काढायला कुठं सावलीची जागाही नाही, गवत नाही, काही नाही. असं अर्ध अंतर चालून आल्यावर कळलं, आता अशक्य आहे. भयानक. कसेबसे कसे पोचलो ते अशा वेळी आमचं आम्हाला माहीत असं म्हणायची पध्दत आहे. आमच्यातला एकजण म्हणाला की हाल करून गँगचा बॉस कुठं आहे ते विचारायची एक पध्दत आहे. असं चालवत जर आपल्याला विचारलं तर लगेच सांगून टाकू. दुसरा म्हणाला की काहीजण भरपूर शारीरिक वेदना सहन करू शकतात. त्यांना आपल्यासारखे मानसिक हाल सहन करायला लावा, मग कळेल. असं या विषयावर बरंच बोलणं झालं. अहो, हे एवढे उरलेले दहा फूट चालणं म्हणजे दहा किलोमीटर वाटले ! यात काय ते समजा.

तिथून पुढं गाण्यांचा विषय निघाला. याच्या आवाजात दर्द आहे, तिच्या आवाजात दर्द आहे असा. त्याला जोडून मीही सांगून टाकलं की एका कवीनं असं म्हटलंय की सर्वश्रेष्ठ कविता या सॅडनेसच्या असतात. हे अर्थात् सगळ्यांना पटण्यासारखंच होतं. मंद प्रकाशात मदिरेचे घोट घेत मित्रांशी गप्पा मारत असताना पार्श्वभूमीवर मंद दर्दभरं गीत किंवा संगीत ! वाह् । असं झालं अगदी. बऱ्याच आठवणी निघाल्या. प्रत्येकाला काही ना काही असं आठवलं की ते कुणाला क्वचितच अनुभवायला मिळालं असेल. पण इथं एक कबूल करावं लागेल की चित्र आणि शिल्प या विषयांवर मात्र आम्ही काही बोललो नाही. आणि नृत्यातलं दर्द कुठे असतं ते एक कुणाला माहीत नव्हतं

आता दुसरीकडचं. तसं काही फार सीरीयस असं काही नव्हतंच. आणि कशाला असावं ? ते ठीक. पण नको ते घडलं. म्हणजे चुकून. दर्द असणं म्हणजे चांगलं. हे एक डोक्यात फिट बसलेलं. म्हणून मी म्हणून गेलो की ज्ञानेश्वरीत काय दर्द आहे, तुकारामात काय दर्द आहे ! असं ! मला शिवीच खावी लागली. तुला काय दारू पीत ज्ञानेश्वरी वाचायचीय -- ऐकायचीय का रे भडव्या ? असं. म्हटलं दर्द असलेलं चांगलं असून तुम्ही चिडताय का ? तर मला ते म्हणाले की तुला खरं दर्द बघायचंय का ? कसं असतं ते ? माणसं उगीचच चिडतात. प्रत्येक गोष्टीचे भावनिक प्रश्न कशाला करायचे ? अवघड आहे. म्हणजे ज्ञानेश्वरी किंवा तुकारामाचे अभंग यांना चांगलं म्हणायची पण चोरी ! दर्द असलेलं काव्य हे सर्वश्रेष्ठ या अर्थी खरं तर मी बोलत होतो. लोकांना काही कळत नाही हा त्यांचा खरा प्रॉब्लेम नाही. दुसऱ्याचं न ऐकणे हा आहे. पण हे तरी सांगायचं कुणी आणि ऐकणार कोण ? अवघड आहे.

तुम्ही म्हणाल की तुमचं कसं कोण कुठं भाषण ठरवेल ? म्हणजे माझं. बरोबर आहे. एरवी तुमचं म्हणणं रास्त आहे. पण असं आधी ठरवून जर कुणी भाषण करायला सांगितलं तर जमतं. थोडंफार मटेरियल गोळा करून तसं तासभर सहज बोलू शकतो मी. आणि तसं थोडंफार कुठल्या विषयावरचं मटेरियल कुठं मिळेल एवढं मला माहिती आहे. प्रश्न तो नाही. असं भाषण ठरलं. जिद्दीनं मी ' दर्द ' हाच विषय घेतला. पण समोरचं पब्लिक बधितल्यावर एक विचार आला की हे भोसडीचे ऐकून घेतील का ? दरदरून घाम फुटला. मग ' अत्यावश्यक वस्तूंचे दरपत्रक ' या विषयावर बोललो. हे अतिशय दर्दमय आहे असं जोडून घेतलं.

मला असं म्हणायचं नाही की माझं सगळंच बरोबर आहे. मी असाही एक माणूस पाह्यलाय की त्यानं दारू सोडली, तंबाखू सोडली, नॉनव्हेज सोडलं इतकंच नव्हे तर एका दिवसात सगळं सपक आणि पथ्थ्याचं खायला सुरुवात केली. जिद्द ! आणि माणूस कसा तर कुठे काय चांगलं मिळतं, कुठल्या हॉटेलातलं काय स्पेशल आहे हे सगळं माहीत असलेला. बऱ्यापैकी खर्च करायची तयारी असेल तर आपल्याला नावंसुध्दा माहिती नाहीत अशा पदार्थांच्या ऑर्डरी देऊ शकणारा ! खरं म्हणजे तशी आत्ता त्याची आठवण यायची काही गरज नव्हती, पण हे सगळं त्यानं एकदा जबरदस्त आजारी पडून झाल्यावर केलं. कधीही फारसा आजारी न पडलेला माणूस. आजारपणातल्या वेदना त्याला फारच असह्य वाटल्या. एकटं पडून करणार काय ?त्याला म्हटलं काही वाच, चांगली गाणी ऐक, तर तो मला काय म्हणाला माहीताय ?

मला थिल्लर गाणी आवडत नाहीत आणि दर्दभरी गाणी सहन होत नाहीत. बाकी तसा तो एक चांगला माणूस आहे पण आता विचार केल्यावर मला जरा गूढच वाटतंय सगळं. पण मला एक असं दिसून आलेलं आहे की त्यातल्या त्यात यशस्वी लोकांना दर्दभरी गाणी आवडतात. काहीकाही म्हणजे बऱ्याच अयशस्वी आणि गरीब लोकांनाही ती आवडतात. पण ही एकूण काय भानगड आहे ते एकदा कळलं तर बरं. एवढंच. एक आपलं कळावं असं वाटतं. काही चूक नाही.

आता मला स्वतःलाही दर्द-- गाण्यातलं-- आवडतं. ते का ते मी सांगायचा प्रयत्न करू शकतो. दुसऱ्यांसमोर नाही. स्वतःपुरता. एक नुसतं आपलं सायलेंट थिंकिंग. दर्दइतकं पायाभूत असं माझ्या जगण्याला दुसरं काही नाही. त्यामुळं दर्दभरा आवाज ऐकला की मला माझ्याच जिवंत असण्याची पुरेशी खात्री मिळते. आता हे कलेचं मूल्य धरावं की नाही याबद्दल मला लगेच थिंकिंग नाही करता येणार. मटेरियल जमवावं लागेल.

एकजण मला म्हणाला की तुझं जगणं बरोबर असेल तर तुझी मूल्यं बरोबर असतील. हे त्याचं बरोबर आहे का हे बघायला मी त्याच्या जगण्यावर लक्ष ठेवून आहे.

*****

# भर

गंमत अशी की अमुक अमुक एक गोष्ट घडून गेलेली आहे. आणि त्या एकूण प्रकारात मी एका अमुक एक प्रकारे वागलो आहे. आणि आता मजा बघा. आता मी विचार करू लागलो की मला वाटतं की मी जे अमुक एक प्रकारे वागलो त्याऐवजी मी तमुक एक प्रकारे वागलो असतो तर अधिक बरं झालं असतं किंवा तमुक किंवा किंवा तमुक किंवा तमुक एक प्रकारे. मग माझं कोणतं वागणं बरोबर ?

परमेश्वराचा दरबार हा असा भरलेला आहे आणि मी हा असा विचार करत बसलो आहे. -- हे थोडंसं नाट्यपूर्ण आणि थोडंसं खोटंही. कारण मला परमेश्वर माहीत नाही आणि हा काही दरबार नव्हे. मग परमेश्वराच्या दरबाराबद्दल खरं म्हणजे मी बोलावंच कशाला ?

प्रश्न मांडायला फारशी अक्कल लागत नाही असं म्हणणं जितकं सोपं आहे तितकं ते खरं असेल की नाही कुणास ठाऊक. पण खरं म्हणजे आपला प्रश्न तरी काय आहे हे समजणं महत्त्वाचं नाही का ? ' महत्त्वाचं ' या शब्दाचं महत्त्व फार तर द्या सोडून. कारण नाहीतर काय होईल की माझं वागणं काय किंवा परमेश्वर काय काहीच महत्त्वाचं नाही असं म्हणून डोळे मिचकावून गप्प बसता येईल. आणि पुन्हा एकदा डोळे मिचकावून वर म्हणता येईल की " आता मी तुम्हाला डोळे मिचकावून गप्प बसता येण्याचं महत्त्व विशद करून सांगतो ..." वगैरे.

तरी लोकहो, टाहो फोडून,नरडं पिळवटून आणि नसा एकवटून मी मलाच विचारतोय की बरोबर वागणं कोणतं ?

एकदा वाटतं की प्रत्येक वागण्याच्या परिणामांच्या इतक्या असंख्य शक्यता आहेत की त्यातल्या कित्येक माझ्या लक्षातही येणार नाहीत -- अशीही शक्यता आहे. त्यामुळं कदाचित् या प्रश्नाचं उत्तर कधीच देता येणार नाही किंवा दिलं तर पुन्हा कालांतरानं ते चूक वाटेल.

मग असं वाटतं की बरोबरच वागलं पाहिजे असं डोक्यावर वजन कशाला ? आणि बरोबर वागणं आणि चूक वागणं असे फरक तरी कितपत बरोबर आहेत ?

आणि मजा म्हणजे असं म्हणत असतानाच असं वाटतं की आपला मेंदू च्या मारी इतका तल्लख असायला नको होता.( मला आपलं वाटतं की माझा मेंदू तल्लख आहे -- खरंखोटं देव जाणे --आणि पुन्हा तेच. देव मला माहीत नाही. ) कारण तो च्या मारी आपल्याला एखाद्या प्रश्नाला तडक भिडू देत नाही. कोण ? मेंदू. म्हणजे मी वेगळा आणि माझा मेंदू वेगळा ! हाही माझ्या मेंदूच्या तल्लखपणाचाच प्रकार ! किंवा माझ्या तल्लखपणाचा म्हणा हवं तर !

आता अगदी खरं बोलायचं म्हणजे अतिविचारानं शेवटी आपण एका अविचारी अवस्थेत शिरायचा धोका आहे. म्हणजे कसला ? वेडं व्हायचा.

तेव्हा विचार थांबवून एक साधी, सोपी, छान आणि छोटीशी गोष्ट तयार करू. अर्थात तयारच करायची.

एक होतं गाव. तिथं एक नदी होती. नदीकाठी होती वाळू. आणि पुढे काही भागात काही झाडी. निरनिराळी झाडं होती. काही लहान,काही मोठी आणि गवत.

तिथं कधी मंद वारा येई, क्वचित वादळ आणि कधीकधी वारा पडलेला असे. दिवस येई आणि मग रात्र. आणि मग दिवस.

नदीच्या पाण्याचे लोक निरनिराळे उपयोग करीत. कुणी अंघोळीला, कुणी पिण्याला आणि कुणी शेताला. किंवा प्रत्येक माणूस अनेक प्रकारे. अशा त्या गावात कधीकधी काही ना काही कारणावरून कसले ना कसले तंटे होत असत. किंवा असंच काहीतरी दुसरं एखादं वाक्य.

संपली गोष्ट. संथ आणि साधी. पण यात आता प्रश्न असा येतो की यात इंटरेस्टिंग असं काहीच नाही, मग ही गोष्ट घ्याच कशाला ? मनात साठवायला सुखाचं काही मिळणं हेच महत्त्वाचं असावं .

आणि यातला विनोद असा की या प्रश्नाचा संबंध आपल्या पाहिल्या प्रश्नाशी लावता येतो. की बरोबर काय ?

म्हणजे असं की कशाची तरी परिणती कशात तरी होत राहिली तरच आपल्याला इंटरेस्टिंग वाटत असावं आणि म्हणूनच आपल्या मनात प्रश्न येत असावा की कोणती परिणती बरोबर ? म्हणजे दोन्ही गोष्टींचा भर परिणतीवरच ?

मग यावर मूर्खपणानं किंवा शहाणपणानं बोलता येण्यासारखं एकच म्हणजे -- परिणतीवर भर असण्याची परिणती निरुत्तरपणात होते. आणि भरीस भर म्हणजे उत्तरं फार सुचतात ! पण साठवणीत भर हवी हो ।

*****

## उलटं काळीज

खरं म्हणजे शाळेतल्या पुस्तकातलं चित्र आणि त्याचं कार्य एवढं सोडलं तर काळीज हा प्रकार मला माहीतच नाही. प्रत्यक्ष काही मी ते पाहिलेलं नाही. तुम्ही म्हणाल की मी मूर्ख आहे. अगदी प्रत्येक बारीकसारीक गोष्टीबद्दलसुध्दा इतकं सारखं खरं बोलायचा प्रयत्न करणं म्हणजे मूर्खपणाच नाही तर काय ! अशानं होणार काय तर जगातली इतर माणसं आपापलं महत्त्व टिकवत राहतील आणि मी मात्र दर मिनिटाला माझं महत्त्व नष्ट करत राहीन. म्हणजे मग शेवटी उरणार काय ? असून नसून सारखेच.

पण उलटं काळीज याचा अर्थ कळायला काळीज माहीत असायची जरूरच काय पण ? -- असा एक बाळबोध प्रश्न विचारून आपण पुढे जाऊ. फार तर ' वटवाघूळ ' हा एक शब्द मधे टाकून ठेवू.

उलटया काळजाचं महत्त्वाचं कार्य कोणतं तर दुसऱ्याच्या काळजाला घरं पाडणं. आता ' घर 'हा शब्द बघा.'घ ' चा उच्चार जास्त आणि ' र ' चा कमी. हेच उलटं करा बरं .' घ ' चा कमी आणि ' र ' चा जास्त. ' घरं '. अर्थ वाईट होतो. छिद्र. उलटया काळजाचं कार्य हे असं असतं. म्हणजे कसं तर आयुष्यातल्या वस्तूंचे आणि घटनांचे उच्चार बदलून त्यांचे वाईट आणि तापदायक परिणाम घडवत राहणं.

इथं आपण मुद्याला हात घातला असं म्हणायला हरकत नाही. म्हणजे कसं की --'उच्चार बदलणं ' म्हणजे काय ? ते कोण बदलतं ? कसं ? का ? आणि त्याचे परिणाम कोणते ? वीस मार्कांचा प्रश्न. सोडवा.

पण मी परीक्षा घेणारा कोण ? तेव्हा हे प्रश्न सोडवण्याऐवजी आपण सोडून देऊ आणि पुढे जाऊ.

नाण्याची तिसरी बाजू, ही चौकट वाटोळी, तीनचोक तेरा, वर्तुळाचे दुसरे टोक -- यात आता आणखी एक राह्यलंय ते म्हणजे -- ' उलटे ठिपके '. मी तुम्हाला नाव आयतं शोधून दिलेलं आहे. तुम्ही कुणीतरी या नावाचं नाटक लिहा. नाहीतर सालं हे पण कुणीतरी लिहून ठेवलेलं असायचं ! आपली मायबोली ही अशीच ! आपण अंदाज करावा आणि ते त्यात नाही असं सहसा व्हायचं नाही. म्हणजे आपल्या अंदाजासारखं आधीच कुणीतरी काहीतरी लिहून ठेवलेलं असतंच । म्हणजे एखाद्याला वाटणार काय की काय समृध्द भाषा आहे ! हे आहेच, ते आहेच ! पण अंदाजाप्रमाणे साहित्य असलेली माझी भाषा जरी भरपूर असली तरीही काय म्हणावं लागेल -- ' अंदाजे भाषा '। आणि बरोब्बर अंदाज करणारे आपण म्हणून अंदाजे आपण ! कधीकधी लोकांना म्हणजे आपल्यालाही प्रश्न पडतो की अंदाजाबरहुकूम सगळं जर आहे तर हवंय कशाला हे ? पण अंदाजांशिवाय काही असतं का आणि त्या मार्गानं कुणी जायचं हा प्रश्न राहतोच. अंदाज चुकले तर टोचून बोललं जातं हेही एक आहेच. अंदाज बरोबर येत चालले तरी मग्रुरी वाढत जाते.

तर ठिपक्यांची रांगोळी आपणच बघू या घालून जमते का ते. समजा-- . -- हा एक ठिपका आहे. म्हणजे काय ? याचा अर्थ जर आपल्याला लावून सांगितला तर असं म्हणता येईल की याला एक स्वतंत्र अस्तित्व आहे. स्थलकालमर्यादेत केंद्रित असलेलं ठाम आणि निश्चित अस्तित्व. पण आता गंमत बघा. हा ठिपका, जो आपल्याला ठाम आणि निश्चित वाटतो -- तो तसा का वाटतो ? तर एकूणच रितेपणात तो एकटाच ठामपणे रोवलेला जाणवू शकतो म्हणून. म्हणजे इतर सगळा रितेपणा आणि हा ठाम, इतर सगळा रितेपणा आणि हा ठाम -- असं.

आपण ठामपणा आहोत, निश्चितपणा आहोत, मर्यादितपणा आहोत -- असं होऊ शकेल -- म्हणजे असतंच -- पण आपण रितेपणा आहोत असं कधी, कुठं, कसं होईल ? मी नुसता असा प्रश्न काढला तर बाकीचे ठिपके माझ्यावर तुटून पडले. नंतर एकदा मी म्हणालो की या रितेपणाकडं आपण लक्षच देत नाही तर सगळे ठिपके हसले.

मला खरं तर काहीच म्हणायचं नव्हतं. उलट त्यांनाच काही ना काही म्हणायंच होतं. खरं तर मी काही म्हणूच शकत नव्हतो.

याचा अर्थ माझी सुखदुःखं मला कळत नाहीत असा थोडाच होतो ? मला रोज भाजी, दूध लागत नाही असा थोडाच होतो ? पण फक्त एक शंका आली मनात त्याचं त्यांनी इतकं माजवलं ! पण शेवटी आपण बंधुभाव ठेवायला नको का ?

म्हणजे काळजा काळजांची ही रांगोळी म्हणजे तुमच्या आमच्या सगळ्यांच्या परंपरा आहेत काय ?

तर मी तुम्हाला आत्ताच लगेच सांगतो. तुम्ही म्हणजे मी. आणि तुमचं काळीज म्हणजे माझं काळीज. किंवा उलटं.

*****

## जिवंत लोक

किती जरी नाही म्हटलं तरी एखादवेळेस होतं काय की एखाद्या गोष्टीचं गांभीर्य आपल्याला पटूनच जातं आणि आपला उरलासुरला प्रामाणिकपणा एकवटून आपण गंभीर होतो. आणि असं थोडंफार, प्रमाणात गंभीर झालेल्या व्यक्तीला कुठं ॲडमिट बिडमिट करता येत नाही ही एक तशी थोडीशी सोयच म्हणायची.

शक्यतो आपली विचाराच्या वगैरे फंदात पडायची इच्छा नसते. धक्के खात, धक्के देत, अडमडत, कडमडत पुढे पुढे, त्यातल्यात्यात सुखात जात राहावं एवढीच आपली आयुष्यात किमान अपेक्षा असते. पण एक मात्र सार्वत्रिक -- म्हणजे अपवादाशिवाय --अनुभव असा की असं काही सालं जमत नाही. एखादा फटका असा जोरात बसतो किंवा जोरात जाणवतो की आपली कित्येक वर्षांची सवयसुध्दा तकलुपी वाटायला लागते. मग बारीकसारीक सवयींची तर बातच सोडा.

सवयी सगळ्या स्थावरासारख्या सांभाळलेल्या आणि मॅन इज अ बंडल आफॅ हॅबिटस् । आणि हे म्हणायचीही एक म्हणजे आणखी एक सवयच ? याला एक प्रकारचा अनवस्था प्रसंग म्हणायचं की काय ? गप्प बसावं हे बरं. तेसुध्दा गप्प बसण्याची सवय होता कामा नये. सवय तर तीच गोष्ट अनेकदा झाल्यावर होते. पहिल्यांदाच गप्प बसल्यावर ती सवय कशी असेल ?

शिवाय असं की न बोलणं एक वेळ जमेल पण गप्प बसणं ? अवघड आहे. म्हणजे अशक्यच. आणि हा असा प्रकार थोडासा -- अगदी किंचितसा जरी बघायची कधी वेळ आली -- तर उपरती झाल्याप्रमाणे आपल्याला सगळीच शंका यायला लागते आणि ही शंका येणं म्हणजेच गंभीर होणं. आणि ही शंका एकदा का आली की मग मात्र सुटका नाही. सवयीबद्दल शंका म्हणजे पंक्चरच सगळं.

शाळाकॉलेजमधले शिक्षक सांगतात, काही शंका वगैरे असतील तर मोकळेपणानं निःसंकोच विचारा. मी कधीही अव्हेलेबल आहे. तशी अव्हेलेबल माणसं याही बाबतीत असतातच. म्हणजे शंकांच्या बाबतीत. महाराज, मला एकूणच शंका येत असून, आजपर्यंत ज्याच्यावर माझ्या आयुष्याची उभारणी केली तो पायाच डळमळू लागलेला आहे आणि त्यामुळं मी फार घाबरून गेलो आहे -- तरी यातला खरा प्रकार काय आहे तो मला सांगण्याची कृपा करावी. मग तो अव्हेलेबल मनुष्य ईश्वकृपेकरून काही स्पष्टीकरण वगैरे देतो आणि स्वतः कुठेही अडकत नसल्यासारखा राहतो. कारण त्याला तसं राहावंच लागतं. कारण ज्ञानाच्या क्षेत्रात आपण फक्त एक निमित्तमात्र माध्यम आहोत असा नम्रपणा राखायची प्रथा असते. वेळप्रसंगी ही प्रथा उघडी पडली नाही तर त्या माणसाचं आयुष्य असं अव्हेलेबल राहात राहात बरं जातं. आता बिझिनेस म्हणजे काही फक्त पैशांची आणि वस्तूंची आकडेमोडच असं काही नाही. जितक्या गरजांच्या तऱ्हा तितक्या बिझिनेसच्या. बिझिनेसची खरी टॅक्ट नव्या गरजा तयार करण्यातही तितकीच असते की हो ! धंद्यात यशस्वी व्हायचं असेल तर आपल्याला जे काही खरंखोटं विकता येण्यासारखं असेल त्याची गरज लोकांना अधिकाधिक कशी वाटेल हे पहा. गरज त्यांची त्यांना वाटली तर ठीक नाहीतर आपण स्वतः ती निदर्शनाला आणून द्यायची. म्हणजे स्वतःहून येतील ते, आपण येणं भाग पाडलेले, आणि इतर अशी भरभराट होत राहते.

तर कुठल्याही जाळ्यातही सापडायला नकोय. थोडेफार स्वार्थ, थोडेफार परमार्थ करत करत जगून झालं तर फार उत्तम. पण निव्वळ अशा थोड्याफार सवयींच्या लेव्हलवर जगणंच जेव्हा तापदायक होतं किंवा शंकास्पद होतं तेव्हा प्रश्न येतो.

थोडंसं काहीतरी लक्षात आल्यामुळं तो माणूस जरा खोलातच डोकावायला लागतो. तो काही बोलला की इतरांना वाटतं की हा आपल्याला उघडं पाडतोय. हा फारच परखड आहे. आपण जे विशेष लक्षातही घेत नाही ते दिसलं की हा ते टराटर फाडत सुटतो. शिवाय याला स्वतःलाही थोडंफार तसं वागावं लागतंच. म्हणजे बघणाऱ्याला तसंच वाटणार. मग इतरांच्या असं लक्षात येतं की आपण जर नकळत हलकट असलो तर हा कळूनसवरून -- जाणीवपूर्वक हलकट आहे. हे तर जास्त वाईट. हे जर जास्त लोकांना वाटायला लागलं तर संपलंच मग ! भीती वाटायला लागते. आणि वेळप्रसंगी ही भीती एक फार भयानक स्वरूप घेऊ शकते.

अल्लाउद्दिन आणि जादूचा दिवा या गोष्टीत असं काहीच घडत नव्हतं. उलट जादूच्या दिव्यामुळं पाहिजे ते घडत होतं -- असं म्हणण्यापेक्षा योग्य ते घडत होतं. मग हे असं का ?

उत्तर देणारे आहेतच ! जास्त विचार करणाऱ्या माणसांचीच डोकी फिरतात. फारसा विचार न करणारी माणसं शेवटपर्यंत शहाणी राहतात. त्यांचं जगून तर होतंच पण शिवाय त्यांना फारशा आत्महत्याही कराव्या लागत नाहीत.

धन्य ते सगळेच जिवंत लोक ! मी एकटाच अलीबाबा आणि तुम्ही सगळे चाळीस चोर असं थोडंच आहे ! एकमेकांना -- आणि किंवा म्हणजेच -- समाजाला धरून राह्यचं महत्त्व आपल्याला कुणी सांगायला हवंय !

ज्या बाबतीत शंकाच नाही त्याची उगीचच चर्चा नको !

*****

## संकलन

१. संकलनच करायचं होतं तर ते याच्याहून चांगलं होऊ शकलं असतं.
२. एवढं ऐश्वर्य आहे घरात पण आंबे आणायचं नाव नाही. मला म्हातारीला काय वाटत असेल !
३. आचारसंहितेमुळं निवडणूक-प्रक्रियेत फार अडचणी आल्या त्यामुळं निवडणुका होऊ शकल्या नाहीत त्यामुळं घटनात्मक पेचप्रसंग निर्माण झाला. आता घटनादुरुस्ती करायची की आचारसंहिता बदलायची हा पेच आधी सोडवावा लागेल.
४. थांबला तो संपला.
५. नो टाईम टु स्टँड ॲन्ड स्टेअर.
६. आधुनिक तंत्रज्ञानाच्या अतिरेकामुळं माणसं व्यसनाधीन होतात.
७. कामाच्या दबावापेक्षा कामात स्वातंत्र्याचा अभाव असणं यामुळं रक्तदाब अधिक वाढतो.
८. काश्मिरप्रश्नी अमेरिकेची भूमिका काय आहे याचा सारखा विचार करत राहिल्यामुळे काश्मिर आपला आहे या शुध्द भावनेत राहताच येत नाही.
९. हक्क कुणी आपणहून देत नसतं, ते हिसकावून घ्यावे लागतात.
१०. असंघटित वर्गावर नेहमीच अन्याय होतो.
११. जे. कृष्णमूर्तींनी साक्षरता प्रसारासाठी काहीच काम केलं नाही.
१२. गरीबी हटाव या घोषणेचं काय झालं ?
१३. विधवांचे प्रश्न प्रामुख्यानं विधवांनाच सोडवावे लागणार आहेत.
१४. इंधनाशिवाय चालणारं मशीन येतंय.
१५. साधं बूट सैल होत असेल तर टाचेच्या मागं बुटात पॅच लावायची सोय नाही.
१६. झेरॉक्स आणि त्याचा प्रिंटआऊट असं एकत्रही आहे म्हणतात.
१७. पीतज्वर आणि कावीळ यात फरक काय ?
१८. स्वतःच्या देशाच्या स्वातंत्र्यलढ्याचा इतिहास तरी निदान माहिती पाहिजे.
१९. आत्तापर्यंत मेमो आणि चार्जशीटच्या भीतीखाली तुम्ही राहिलात पण घाबरू नका. तुम्ही घाबरून काम करत राहिलात तर तुमची निर्णयशक्ती खच्ची होईल आणि संस्था बुडेल. आपल्याला संस्था जगवायची आहे.
२०. खूप संशोधन व्हायला हवंय.
२१. माणसं कमी करून खर्चात कपात करणं शक्य आहे पण त्यामुळं दहशत आणि असुरक्षिततेची भावना वाढेल, मग उरलेले कर्मचारी अपेक्षित रिझल्टस् कसे देतील ?
२२. आजचा इंडिया हा उद्याचा भारत आहे. आणि उद्याचा भारत ही जगातली सर्वश्रेष्ठ शक्ती असेल.
२३. जर्मन माणूस संस्कृतचा अभ्यास करायला आलाय पण आपल्या संस्कृतीचं आपल्यालाच मोल कळत नाही.
२४. पाय आपल्या मातीत घट्ट रोवलेले पाहिजेत.
२५. परंपरेचा अभ्यास नाही आणि नवीन करायला निघालेत !
२६. यापुढे स्पेशलायझेशनला महत्त्व राहणार नाही.
२७. माणसाच्या गरजा तशा फार कमी असतात.
२८. कोणत्या मार्गानं विश्लेषण करावं हे ठरवायला आधी कशाचं विश्लेषण करावं लागेल ?
२९. इतक्या विषयांवरची इतकी पुस्तकं निघतायत आणि आपण वाचत बसलोय कथा न् कादंबऱ्या.
३०. ॲलन बॉर्डर निवृत्त झाला.
३१. माधुरी दीक्षितला तोड नाही.
३२. लोकप्रियतेच्या बाबतीत अमिताभचा विक्रम कुणीच तोडू शकणार नाही.
३३. स्वयंचलित बंदुका आणि स्वयंचलित विमानं हे काय प्रकार असतात ?
३४. संरक्षणव्यवस्था ही वेळप्रसंगी आक्रमण व्यवस्था होऊ शकते.
३५. न्यायासाठी आयुष्यभर संघर्ष केल्यामुळे त्यांना शांततेचे नोबेलप्राईज मिळाले. त्यांच्यामुळे वर्णभेदाचा काळाकुट्ट कालखंड समाप्त झाला.
३६. अतिरेक्यांवर रागावून प्रश्न सुटणार नाहीत.
३७ एकदा मोरगाव आणि जेजुरीला जाऊन यायचंय. आणि थेऊर आणि भुलेश्वर.

३८. एस्सेल वर्ल्डचं तिकीट फार आहे म्हणतात.शिवाय आतल्या प्रत्येक खेळाचं वेगळं.

३९ पानात अन्न टाकून उठायला लाज नाही वाटत ?.

४०. तुमच्या आवडीनिवडी तुम्ही बदलल्या पाहिजेत.

४१. घरातली प्रकाशयोजना कशी असावी, जमीन कशी असावी, रंग कसे असावे या सगळ्यांची शास्त्रं विकसित होतायत.

४२. त्यांचा व्यासंग खूप होता पण नॉर्वेमधे झालेल्या संशोधनाची त्यांना माहिती नव्हती.

४३. मी गेली पाच वर्षं वर्तमानपत्र वाचलेलं नाही.

४४. असाच सकाळी फिरायला गेला आणि तिथंच हार्टअ‍ॅटॅकनं गेला.

४५. राज्यात चाळीस हजार एकरात तुती लागवडीची योजना.

४६. शेअर बाजार गडगडलाय पण तात्पुरता.

४७. वाटण्या करायच्यायत म्हटल्यावर कसा हजर झाला !

४८. जिल्हा न्यायालयातील बेलीफचे कसदार अनुभव.

४९. त्यांनी सामान्य माणसांचे प्रश्न हाताळले कारण असामान्यांचे प्रश्न त्यांना माहीतच नव्हते.

५०. चंद्राजवळ बुध आणि शुक्र दिसतील.

५१. वास्तुशांती आणि सत्यनाराणमहापूजा.

५२. मराठी टीका कसदार नाही कारण तसं आव्हानात्मक साहित्यच नाही. आव्हानात्मक साहित्य नाही कारण ते कुणाला नकोच आहे. ते कुणाला नकोच आहे कारण ....

*****

# माहीत असण्याचा कंटाळा

माझ्या कोणत्याही म्हणण्याला फारसा विरोध व्हायला नको होता. म्हणणं तरी असूनअसून काय असणार आहे ? माझ्या स्वभावाला धरून माझं आयुष्य सुरक्षित राहावं असं काहीतरी ! म्हणजे मीच माझी स्वतःची हेटाळणी करतोय असं समजू नका. कारण विचारस्वातंत्र्याचा अगदी कडेलोट केला तरी फार फार तर हेच असणार. तत्त्वज्ञान मांडणाऱ्याचा स्वभाव वगळून त्याचं तत्त्वज्ञान म्हटलं तर काय उरेल ?

लोक म्हणत होते की लोकशाही महत्त्वाची आहे. ती सगळ्यांच्या स्वभावाच्या सारांशावर चालते. असा काढता येतो सारांश ? पण लक्षात आलं की सगळ्यांना वेडे म्हणण्यापेक्षा आपण वेडे आहेत हे कबूल करावं लागेल. त्यापेक्षा सगळ्यांना शहाणे म्हणून आपणही त्यांच्यापैकी एक झालेलं काय वाईट आहे ? म्हणून मग हुकूमशाही कशी वाईट असते या विषयावर बोलण्याचा परिपाठ ठेवला. पण अचानक मला जर विचारालं असतं की लोकशाही आणि हुकूमशाही यातला फरक स्पष्ट करा तर माझी भंबेरी उडाली असती.मला काही बोलता आलं नसतं असं नव्हे पण मला न समजलेलं बोलावं लागलं असतं।

वैचारिक लेव्हलवर काय झालं ते सांगितलं तर कलेचे भुकेले अस्वस्थ होतात. इंद्रियगम्य काहीच नाही. वस्तू कुठायत सगळ्या ? माध्यम वापरतोयस भडव्या तर सरळसरळ दिसेल असं वापर नं ! आणि त्याच वेळी दुसरे लोक म्हणतात काय भडवे प्रतिमा वगैरे वापरतात, त्यांचं त्यांना तरी कळतं की नाही कोण जाणे ! पण कलावाले म्हणतात वाह् ! काय कला ! माझा विचार असा की वस्तूंची माहिती ही असतेच. त्यासाठी काही खटाटोप करावा लागत नाही. उदाहरण हवंय ? हे घ्या.

उजेडातनं लगबग निघालेली प्रेयसी थबकली. तिचा केसांतल्या चांदण्यात एक काजवा होता. तिला ते कसं लक्षात आलं असेल ? तिनं ओढलेल्या सिगरेटच्या झुरक्यानं तिला ठसका लागला असेल की तिच्या पावलांमधलं अंतर कमीजास्त झालं असेल ? तिचं मन पाण्याचंही प्रतिबिंब दाखवील असं चपळ झालं होतं, पण ती असं दाखवू इच्छित होती की ती शांत आहे. प्रियकराच्या आठवणीनं ती मनोमन लाजत होती. तरीही पदर सावरताना जणू काही पदर सावरण्याकडे तिचे लक्षच नाही असे ती समजून चालत होती. एका अर्थी ही शेवटची पहाट होती. तांबडं फुटलं असतं तर उजेड पडला असता. तांबडं फुटणारच होतं. तिला वाटलं आता फक्त उरलेले क्षण आपले आहेत. ते जोपासले पाहिजेत. आणि ती धावत सुटली. प्रियकराचा अजून पत्ता नव्हता पण तरीही व्हायचं ते होऊन गेलं होतं. हा पुढचा दिवस होता. तिनं तारीख पाहिली. एक तारीख ! वाह् । ही तर आवडती तारीख । सुखोपभोगांची तारीख । छान । तिचं जेव्हा हृदयाच्या ठोक्यांकडे लक्ष गेलं तेव्हा तिच्या लक्षात आलं की घड्याळ बंद पडलं आहे ! मसालेदार पदार्थ चाटणारी पायवाट उपाशी आहे !

हे कसं वाटलं ? खोटं बोलू नका. कळलं नाही तरी आवडू शकतं. आणि इथं थांबा. रहस्य इथंच आहे.

आवडीनिवडीबद्दल तुम्ही मला सांगताय ! का सांगू नये ? मी काय सर्वज्ञ थोडाच आहे ? मग आता तुम्ही स्वतः सर्वज्ञ आहात का ते सांगा. दुसऱ्याची फजिती करताना तुम्हाला बरं वाटतं पण तशीच फजिती स्वतःची होऊ शकते हे कसं कळत नाही ?

उव्देगू नका,पिंजारू नका.
तुमच्याइतकेच तीव्र दुःख झेललेले जिवंत आहेत --
त्यांच्या स्वभावापासून शिका.
( आणि आता तुम्ही म्हणताय, मी आहे हा असा आहे ! जगेन तेवढा जगेन ! काय फरक पडतोय !)
चिखलात मी हळूहळू बुडत चाललोय.
समोर दूरवर कुणीही नाही.
ओरडण्यात शक्ती वाया दवडण्यापेक्षा जिवंत आहे
तोवर
जगण्यावरच लक्ष ठेवतो.
( कुणी म्हणालं दुसरा पक्ष प्रभावी होतोय. कुणी म्हणालं या प्रश्नावर सरकार गडगडेल.)
करप्शप वाईट. अनीती वाईट.
आम्ही स्वच्छ आणि नीतीमान शासन देऊ.
कळ्या फुलत होत्या. निर्झर वाहात होते. आकाश आपल्या रचना बदलत होते.
शेवटी मला एकच सांगा, तुम्हाला काय आवडतं ? आणि हे तुम्हाला माहीत असण्याचा तुम्हाला कंटाळा कसा येत नाही ?

*****

# बरंचसं पटण्यासारखं

गंमत म्हणजे एखादी गोष्ट फेल झाली तर ती का फेल झाली ते विचारायची पध्दत होती. लोक असं करतील असं वाटलं होतं पण त्यांनी असं केलं -- असं काहीतरी कारण असायचं. त्यातही, लोक असं करण्याची शक्यता गृहीत धरून ही तजवीज केली होती, पण अमुकअमुक लक्षात आलं नाही. असं काहीतरी असायचं. मला वाटायचं की वस्तुतः ते पटण्यासारखं आहे. पण ते म्हणायचे की हे तुमच्या लक्षात यायला हवं होतं. लक्षात येणं किंवा न येणं हेही त्यांना महत्त्वाचं नव्हतं. शेवटी ते म्हणाले की कदाचित तुम्ही कमनशिबी असाल. म्हणूनच तुम्हाला यश येत नसावं. आम्हाला तुमच्याइतका बुध्दिमान नसला तरी चालेल पण यशस्वी होणारा माणूस हवाय. आमचे पैसे गुंतलेत. नफा व्हायलाच पाहिजे. मला त्यांचंही पटत होतं. शेवटी त्यांनी मला काढून टाकलं. हा मला अन्याय वाटला. पण हा अन्याय त्यांनी केलाय असं म्हणण्यात अर्थच नव्हता. कारण त्यांचंही पटण्यासारखं होतं.

म्हणून मग मी ठरवलं की लंबेचौडे आडाखे बांधण्यापेक्षा नशीबावरच भर द्यावा. नशीबाला शरण गेल्यावर तरी ते आपल्याला साथ देईल. दरम्यानच्या काळात त्यांनी माझ्या जागी दुसरा माणूस घेतला होता. आणि मला अजून कुणीच घेत नव्हतं.

तो माणूस त्या मानानं बराच यशस्वी झाला. मला दुसऱ्याच प्रकारची नोकरी मिळाली. तिथं मी जे करत होतो ते इथं दुसराच करत होता. त्याला मी काय ठरवलं होतं ते सांगितलं. पण ते ठरवलेलं माझं जरी अजून अंमलात आलेलं नसलं तरी तू विचारात घे म्हटलं. तो हसला. त्याचं म्हणणं अस  पडलं की तसं नशीबाला शरण वगैरे जायची आवश्यकता नाही. कारण आपण कसे प्रयत्न करणार, नशीबाला शरण जाणार की नाही -- हेही नशीबातच असतं.

मग मी हे वेगळ्या प्रकरचं काम नीट करत राह्यचं असं ठरवलं. दुर्दैवाचा भाग असा की हेच काम कमी कॉस्टमध्ये कसं करता येईल हे सांगणारा एकजण मालकाला भेटला. आलंच. भडव्या, हे तुला सुचलं नाही ? त्यानंही अर्थातच मला काढून टाकलं.

आता मात्र प्रश्न आला. मला जमू न शकणाऱ्या आणि मला सुचू न शकणाऱ्या अशाच गोष्टींचा अभ्यास करावा असं ठरवलं. मी अशक्त होतो तरी गिर्यारोहणाला जाऊन अर्ध्यातनं परत आलो. मला एक साधी युक्ती हवी होती पण ती काही सापडत नव्हती. मग तिसरी नोकरी लागली. मग म्हटलं इतका निकराचा संघर्ष करण्यापेक्षा आपण आहे तसं राहावं आणि जे होईल ते होईल असं धोरण ठेवावं. अचानक एक दिवशी मालकानं पाचशे रूपये हातात ठेवले. म्हणाले,बक्षीस ! कशाचं? तर तुम्ही जे करताय त्याचंच !मी हादरलो ! म्हटलं कसं काय?तर त्याचा पाच लाख रूपये फायदा झाला होता !

हे भयानक होतं. म्हणजे मला भयानक वाटलं. ही काय भानगड ? माझ्यामुळं फायदा ? काय ग्रह बदलले का काय ? आणि माझे न् त्याचे एकदम ?

काही तथ्यच वाटेना. म्हटलं तिच्यायला जगलं काय आणि मेलं काय, सारखंच आहे ! विशेष म्हणजे याही काळात माझ्या कामाचं कसं चीज झालं वगैरे मी सगळ्यांना सांगत होतोच.

फक्त एका मार्कानं माझी मेडिकलची ॲडमिशन हुकली होती. नाहीतर मी खरं तर डॉक्टर झालो असतो. पंतप्रधानांचं म्हणणं होतं की न्यायावर आधारित समाजरचना उभारणं हेच महत्त्वाचं आहे.

त्यांच्याकडे गेलो. मला बाहेरच्या बाहेरच हाकललं गेलं. तेही बरोबर होतं. च्यायला कुणीही येईल. खूनबीन झाला म्हणजे ? त्यांना मला विचारायचं होतं की न्याय आणि नशीब यातला फरक स्पष्ट करा. मजा आली असती.

पण राहून गेलं.

*****

# समजणं

मला अध्यात्मातलं काही कळत नाही याचा अर्थ मला काहीच कळत नाही असा नाही. स्वच्छ फरसबंद फ्लॅटमध्ये फिरताना बरं वाटतं. म्हणजे हे कळतं. माझ्या मनात असं थोडंच आहे की जगाचा नाश व्हावा ? पण मला भलतेसलते प्रश्न विचारले -- ज्यातलं मला काही कळत नाही -- तर मी काय करणार ?

फार ताण तयार करायचा नाहीय. पण मला एकच प्रश्न पडतो की मी कितीही कष्ट केले, इतर बऱ्याच जणांपेक्षा श्रेष्ठ ठरलो तरी मला मर्यादा आहेत हा माझा दोष आहे का ? गंमत म्हणजे --म्हणजे -- माझी व्यक्तिवैशिष्ट्यं काहींना आवडतात ! माझ्या हातात जेव्हा पंखा होता तेव्हा सरिता म्हणाली की अजून या पंख्याचं महत्त्व आहेच कारण स्टेडियममध्ये गारवा आणायची यंत्रणा अजून निघालेली नाही. मी म्हटलं, यात एवढंच लक्षात आलं तुझ्या ? मार्केट ट्रेंड्स् जेव्हा सतीशला फेव्हरेबल झाले तेव्हा तो खूष झाला हे नाही लक्षात आलं ? हा विषय तू दिलास सोडून आणि मराठी गाण्यांचा विषय काढलास. मराठी गाणी ! जेवढा लंबक लांबवाल तेवढी चाल चांगली ! मग शब्द कुठलेही घाला ! हे ठीक आहे पण या गाण्यांमुळे एकूण होतंय काय हे बघणार की नाही ? मला न पडलेल्या स्वप्नांची गाणी हे माझ्या गळी उतरतायत हे कधी बघणार की नाही ? अशी स्वप्नं पडणारा जर का मी असतो तर मला जगणंही अशक्य आहे -- हे लक्षात येऊनही हे सगळं माझ्या गळी उतरवलं जातं-- ते कशामुळं ? तर अर्थात् मला वेळ घालवायचा असतो म्हणून !

खरं म्हणजे कुठल्याही प्रश्नाचं कुठलंही उत्तर मला अगदी करेक्ट वाटत नाही. ते उत्तर मी स्वतः दिलेलं असलं तरी ! मांजर पाळणं हा काही अगदी जीवनमरणाचा विषय आहे का ? तर होय-- आहेच ! -- हे उत्तर उदाहरणार्थ घेतलं तर हे अगदी करेक्ट आहे की नाही हे मला सांगता येत नाही.

मी नुस्तं सांगितलं होतं की दिल्लीहून येताना माझ्यासाठी एक स्वेटर आण. तेसुध्दा का तर स्वस्त मिळतो म्हणून. आता त्या व्यक्तीनं आणलेला रंग, डिझाईन मला आवडेलच कशावरून ? पण त्या व्यक्तीनं लक्षात ठेवून आणला -- यालाही महत्त्व आहेच नं ? म्हणजे माझी भावना ! काय चाटायचीय ?

अरे बेट्यांनो माजू नका. तुमचं नॉलेज एका क्षणात भस्मसात होऊ शकतं याची तरी जाणीव ठेवा. शेवटी काय आहे ? शोध लागणं, त्याचा उपयोग होणं -- हा प्रॉब्लेम नाही. मग काय आहे ? त्याच्या आधारावर वैयक्तिक श्रेष्ठत्व तयार होणं हेच ! हे तरी अगदी करेक्ट आहे का ?

शनि शिंगणापूरला असं नाही. दारं उघडी असतात. चोरी होत नाही. चोर घाबरतात. म्हणजे काय ? वेगळ्या प्रकारे तेच ! ते असले या विचाराचे असतात ! किंवा दुसरे -- कम्युनिस्ट ! अंधश्रध्दाविहीन ! स्वतःला म्हणवणारे ! पण प्रत्येकाचा मेंदू वेगळा चालातो हे साधं स्पष्ट दिसणारं सत्य न समजणारे ! म्हणजे प्रत्येकाचा भ्रम वेगळा असतो हे न समजणारे ! अरे वेड्यांनो, सगळा जर परिस्थितीचा परिणाम असतो, आणि त्याच कारणानं सगळे जर वेगवेगळे असतात तर तुम्ही कसलं सगळ्यांना कॉमन तत्त्वज्ञान मांडता ? फक्त मर्यादाच असतात हे जर तुम्ही मान्य करता तर अमर्यादित आविर्भाव कशाला आणता ? मर्यादांची जोपासना, प्रगती, बदल एवढंच विश्व असलेल्या बाळांनो, श्रीकृष्ण पहिला कम्युनिस्ट होता, ज्ञानेश्वर दुसरे आणि तुकाराम तिसरे-- असं म्हणणं - आणि मला सर्वश्रेष्ठ माना असं मी म्हणणं यात काय फरक आहे ?

तिला माझं आकर्षण वाटलं म्हणून ती म्हणाली की तिचं माझ्यावर प्रेम आहे. माझं प्रेम होतं एका तत्वज्ञानावर ! समजा कम्युनिझमवर ! आला वांधा !

तिचं म्हणणं मी विचाराला महत्त्व देतो. कुणी दुसरे म्हणाले की मी विचाराचा उपयोग चुकीचा करतो. विचारानंच दुसऱ्याही काही गोष्टी सिध्द होतात म्हणाले ! तुम्ही आपलं सरळ तिच्या प्रेमाला प्रतिसाद देणं बरं असं म्हणाले। म्हणजे म्हटलं तर तुच्छपणेच ! एक स्त्री म्हणून मलाही ती आवडली हे एक ठीक. पण हा अपमान का म्हणून ? या आव्हानामुळंच मी माझ्या सुखाला तिलांजली द्यायचं ठरवलं.

माझ्या हातात काही नाही. कम्युनिस्टांच्याही नाही. भांडवलदार तर बोलूनचालून भिकारचोटच ! यशस्वी होणं म्हणजे समजणं असं समजणारे ! म्हणून विद्यार्थी समोर आले की मी ओशाळतो. म्हणतो, " एखादी गोष्ट मला विचारणं हाच तुमचा मूर्खपणा आहे ."

*****

## जबाबदारी

मी एकेक घोट गार पाणी पितोय. बरं वाटतंय. इतकं साधं. कशाला हव्यायत लांबलचक गोष्टी ? खरं तर काही गरज नाही. हे एवढं इतकं साधं असू शकत असेल तर वळण देणाऱ्या घटना, भाषणांचे परिस्फोट, विजय, पराभव हवेतच कशाला ?

पण आहेत. मला माहिती नसतं. अचानक अशा सगळ्या वस्तू, माणसं सोलली जायला लागतात. घरं, खुर्च्या, कारखाने, दिवे -- सगळं. सोललं गेलेलं संपतं. सालं पुन्हा दिसत नाही. नुसतं आत आत. आणि सगळ्या गोष्टी सोलून संपतात. आता काय ? काहीच नाही. माझ्यासमोर फक्त काहीच नसणं. आणि मीही काहीच नसणं. तरी मी खुर्चीला हात लावू शकतोय. मला सगळं दिसतंय. म्हणजे बाहेर काहीच सोललं जात नव्हतं. मीच सोलला जात होतो बाहेरून आत.

मी हे कुणाला सांगत नाही. कारण मला माहीत आहे की हे कुणाला पटणार नाही. कुठल्याही गोष्टीचा आपल्यावर काही ना काही परिणाम होणारच हे निश्चित् वाटणाऱ्यांना हे सांगण्यात काय अर्थ आहे ? त्यांचा दोष आहे किंवा ते मुद्दाम दुष्टपणा करतात असं माझं म्हणणं नाही. त्यांना वाटतं की या व्यतिरिक्त जगण्याची काही पध्दत असणं शक्य नाही. यातच साधकबाधक विचार करून आखणी करत राह्यचं. आणि एवढं पुरेसं आहे. आयुष्य जगून होत राहतंच. आपोआप. याव्यतिरिक्त काही असेल तरी कसं ?

रिक्तपणाचं कुणालाच काही नाही. पण याचा अर्थ मला कुणी हात लावू शकत नाही असा नाही. सगळ्यांना क्षुद्र धरून चालायचं. सगळेजण यशासाठीच झटतायत असं गृहीत धरायचं. मग परिस्थितीच्या ओघात आपल्यापेक्षा कमकुवत पोझिशनमध्ये असलेल्याला तुच्छ लेखून वागलं तरी काय हरकत आहे ? तो तुच्छपणा स्वीकारायची त्याला सवय लागली म्हणजे आपलं काम झालं. तो कायम आपल्या पंजात राहणार. हालचालच करणार नाही.

पण याचा अर्थ असा की मीही दुसऱ्या कुणाच्यातरी पंजात राहणार. मलाही अशीच सवय लागणार. तिकडं तसं आणि इकडं असं -- असं होणार. सगळ्या गोष्टींचे परिणाम होतच राहणार म्हटलं की असंच जगावं लागणार.

ती म्हातारी माझ्या ओळखीची नव्हती. ती इतकी वर्षं जगली पण माझी ओळख आत्ताच झाली. तिच्या अंगावरच्या, चेहऱ्यावरच्या एकेक सुरकुतीचा तिला अभिमान होता. यातली प्रत्येक सुरकुती माझ्या सहनशक्तीची कहाणी सांगेल असं ती म्हणाली. अरे पण इतकं सहन करावं लागलं हे काय अभिमानास्पद आहे का ? तिनं मला अनुभवाचं महत्त्व सांगितलं. आता तिचा कुणी सहजासहजी अपमान करू शकत नाही असं ती म्हणाली. मनानं त्या अपमानाच्या वर कसं राह्यचं ते अनुभवानं तिला आत्मसात झालं आहे असं ती म्हणाली. तिच्या नादी लागणारा आता फजित होतो आणि खजिल होतो हेही तिनं सांगितलं.

यासाठी इतक्या सुरकुत्या ! अनुभवानं शहाणं होण्यासाठी अनुभवांतून जावं लागणारच. अनुभवांतून जाताजाता मन आत्मसंरक्षणाच्या भूमिकेतून ॲडजस्ट होत जातं. तोच मार तसाच पुन्हापुन्हा खाण्यापेक्षा ते वेगळं रूप घ्यायला शिकतं. हेच शहाणं होणं. मला तर हे भरमसाठ कष्टाचं शून्य फळ वाटतं. कारण हे असं अनुभवातून शिकण्याच्या नादात मन किती वाकडंतिकडं होऊन जातं. अशा वाकड्यातिकड्या -- विचित्र आकाराच्या मनाशी वागणं इतरांना जरा अवघड वाटणारच. पण हे साध्य करण्यासाठी ताजेपणा गेला. बऱ्याच बाबतीत कशाचं काही वाटणं बंद झालं. दुःखही वाटायचं कमी झालं. म्हणून तेही चालवून घेता येऊ लागलं. म्हणजे काही प्रश्नच नाही.

मनाचा आकार तरुणपणातच वेडावाकडा करून घेता आला पाहिजे. हे अशक्य नाही.

भल्या पहाटे जाग येताना जेव्हा पक्ष्यांचे आवाज ऐकू येतात तेव्हा कळतं की सालं मनाला हे आवाज ऐकू यायचे बंद झाले तर ? जितकं मन पिरगाळलं जाईल -- वेडंवाकडं होत राहील तितकं ते आता आहे असं राहणार नाही. मग आता आहे असं राहावं का अनुभवातून शिकावं ?

हा सगळा अनुभवातून शिकण्याचाच भाग. आधी ठरवणं आणि मग वागणं. आपलं आता संरक्षण केलं पाहिजे हे एकदा पक्कं असलं की झालं.

उच्छ्वासातून जर दूषित पदार्थ बाहेर टाकले जात असतील तर असं नैसर्गिक सगळंच का नसावं ? अनैसर्गिकपणाची जबाबदारी माझ्यावर का ? मी थोडंच मला घडवलंय ?

*****

# अपलाप

ही कल्पना कशामुळं सुचली ते आधी सांगतो. म्हणजे उगीचच खोटं वाटायला नको. ही कल्पना जरी म्हटलं तरी कुठली ते अजून सांगायचं आहे. हे माझ्या लक्षात आहे.

सांगतो. काय होतंय, तर सगळ्यांनाच असह्य होतंय. पण अगदी तुटण्याइतकं नाही. कसंबसं झेपण्याइतकं. म्हणजे इतकं की प्रत्येकाला वाटावं की कधीही तुटेल. तर कल्पना अशी की एक वेळ ठरवायची. अमुक दिवशी सकाळी अकरा वाजता भोंगे वाजले की जगातल्या सगळ्या माणसांनी स्पीड कमी करायचा. सगळाच. स्पर्धेचा, रागाचा, यशस्वी व्हायचा, कुरघोडी करायचा, स्वतःलाही न पटणारं सिध्द करायचा, आपण चांगले असून दुसरे वाईट आहेत असं वाटण्याचा, खऱ्याची दुनिया नाही असं म्हणण्याचा, आपण गरीब आहोत म्हणून आपल्यावर अन्याय होतो असं वाटण्याचा आणि पैसा असला की कुणीही आपल्याला हात लावू शकत नाही असंही वाटण्याचा, वगैरे. म्हणजे जग आणि मानवी आयुष्य सगळ्यांनाच झेपण्याच्या आवाक्यात येईल.

पण तिच्यायला असं दिसून आलं की ही इतकी चांगली कल्पना हसण्यावारी नेली जाते. माझं काय म्हणणं होतं की या हलकट गोष्टी सगळ्या चालूच ठेवायच्या. पण स्पीड कमी करायचा. तीव्रता कमी करायची. जगात सगळ्यांनीच एका क्षणी हे केलं तर ज्याची त्याची यशाची स्थानं तीच राहतील पण सहन होण्याइतपत तरी होईल ! वारंवार पाऊस पडला आणि पुढंही पडत राहिला म्हणजे त्याची महिन्यांची मर्यादा ओलांडूनही पडत राहिला तर आपण काय म्हणतो की पावसाळा लांबला. म्हणजे बरोबर नाही असं आपलं म्हणणं असतं. मग त्याच पध्दतीनं कुरघोडी लांबली, राग लांबला असं होत नसेल? म्हणजे पावसाइतकंच किंवा पावसासारखंच हे सगळं नैसर्गिक समजलं तरी ? कुणी म्हणतील की पावसानं असा असा मूड तयार होतो, त्याचं उदाहरण कशाला घेताय ? उदाहरण घेतलं की मूड राहतो बाजूला आणि नुसतंच तर्कशास्त्र येतं ! त्यापेक्षा तो मूड महत्त्वाचा धरावा आणि काय ते बोलावं. उदाहरणामुळे सत्य मागे पडतं ! व्हेरी गुड. आता मी उदाहरण देणारच नाही. पण प्रॉब्लेम कुठला सोडवायचाय हे तुमच्या लक्षात आहे नं ? स्पीड आणि तीव्रता कमी करून सगळ्यांनाच सगळं सुसह्य करायचंय. आणि असं करायला पाहिजे हे सगळ्यांना मान्य होण्यासारखं असल्यामुळं काही प्रॉब्लेम नाही. पोझिशन्स सगळ्या त्याच राहणार, पण सुसह्य !

याच्यावर एक सज्जन काय म्हणाले सांगू ? म्हणे, या क्षणाचा फायदा घेऊन सध्या माझ्या मागे असलेला माझ्या पुढे जाईल ! आणि नंतर त्याला अप्रामाणिक म्हणून काही उपयोग नाही.

मग म्हटलं, मरा भडव्यांनो ! म्हणजे आपण मरू या भडव्यांनो ! नम्रपणाची इतकी भयानक गरज असलेलं जग किती भयानक असेल याची कल्पना करा ! म्हणजे करू या !

एकजण फारच कुत्सित होता. त्यानं काय म्हणावं ? इतका वेळ ज्याअर्थी तुम्ही एका विषयाला धरून बोलताय त्याअर्थी जग सुधारलेलंच आहे म्हणाला. तुमची कल्पना राबवून बघायचीसुध्दा गरज नाही म्हणाला.

कुत्सित माणसापुढं मी हार खातो. नेहमीच. त्याला हरवायचं काहीच नसतं. तो आधीच खतम् झालेला माणूस असतो. अशा माणसाशी लढताना मी नेहमीच हरतो.

म्हणजे याचा अर्थ काय की या कल्पनेत तथ्य नाही ? आणि हे कशाच्या आधारावर ? तर एका कुत्सित माणसानं मला हरवलं म्हणून ? थोडी तरी सत्याची चाड बाळगा !

बरोबर आहे. हे होणं शक्य नाही. ही एक कल्पना आहे. अरे, पण या जगात, या मानवजातीत, अशी कल्पना एका माणसाच्या डोक्यात येते याची तरी काही लाज ?

ते जाऊं द्या. तुमची काय कामं आहेत ती बघा. जगाची प्रगती खोळंबलीय ! भलं करा. तुमचं, माझं, सगळ्यांचं !

तुमची काय ताकद आहे ? माझी तरी काय ताकद आहे ? आपण फक्त विषयाला धरून बोलणारी माणसं !

विषय सोडला की झाला ! सत्याचा अपलाप !

*****

# मेंदू

मेंदू ही सेंट्रल गोष्ट आहे यात वाद नाही. पण मेंदूबद्दल काहीही म्हणायचं झालं तर मेंदूचाच उपयोग करावा लागतो. हाच एक प्रॉब्लेम धरला तर काय होतं ते पाहू. कारण हा जर प्रॉब्लेम नसेल तर मेंदू आहे ते बरं आहे असं म्हणून मोकळं व्हावं लागेल. आणि हे इतकं सोपं नाही हे आपल्याला अनुभवानं माहीत आहे. मोकळं होता न येण्याचं कारणही मेंदूच.

समजा मेंदू म्हणजे पृथ्वी आहे. कुठं दंगली चालू आहेत, कुठं लग्नसमारंभ, कुठं नवा समझोता, कुठं वाढदिवस, कुठं देशाच्या घटनेला दोनशे वर्षं पूर्ण झाल्याचा उत्सव तर कुठं कुणाच्या मृत्यूचं दुःख. शिवाय वगैरे. यातलं संपूर्ण पृथ्वी कळण्याचं ठिकाण कुठलं ? किंवा दुसरं उदाहरण घ्या. ब्राम्हण, मराठा, कोळी, माळी, चांभार इत्यादी सगळे मिळून समजा समाज होतो. तर संपूर्ण समाज कुणाला दिसू शकेल ? प्रश्न क्लिअर व्हायला हवाय. समजा तीनशे पानांचं पुस्तक आहे. त्यातलं कुठलं पान संपूर्ण पुस्तक असेल ? जी गोष्ट सीरीयली चालणार, क्रमाक्रमानं काम करणार, एखाद्या खड्डयात अडकून पडणार, मऊ हवामानात हुंदडत सुटणार -- ती गोष्ट कुठल्याही क्षणी स्वतःचं संपूर्ण असणं असू शकेल का ?

जाऊं द्या. विषय बदलायलाही हरकत नाही. पण मला एक सांगा की मेंदूवर किंवा मेंदूत कुठलीही ॲक्टिव्हिटी चालू नाही असं कधी झालंय ? जी कुठली एक ॲक्टिव्हिटी चालू असते ती तर मेंदूची संपूर्ण ॲक्टिव्हिटी नसते. म्हणजे स्त्रीनं पुरुषाबद्दल बोलायचं किंवा पहिलीतल्या मुलानं डॉक्टरबद्दल बोलायचं किंवा कुणीही एकानं दुसऱ्याबद्दल बोलायचं -- असाच हा प्रकार होणार.

आता याच्यावर कुणीही  काय म्हणेल ते कुणालाही सांगता येईल. यातला 'कुणीही' आणि 'कुणालाही' हे दोन शब्द वाटलं तर सोडून द्या. इन्स्टल्ट झाल्याचा क्षण कुणाचा लौकर जातो, कुणाचा उशिरा जातो. पण तो क्षण असेपर्यंत सहनच करावा लागणार. तो क्षण चालू असताना, त्याच वेळी वाढदिवसाच्या आनंदात कसं राहता येईल ? आणि समजा एका वेळी सगळं थोडंथोडं असलं तरी एक काहीतरी मेजर असणार आणि एक काहीतरी मेजर नसलं तरी सगळं मिळून होणारं जे असेल ते मेजर असणार. फक्त हे मेजर कशामुळं आहे हे फार तर एका क्षणात कळणार नाही. किंवा फार तर कधीच कळणार नाही.

खरं तर मुद्दामहून कुठला विषय काढायचा नाहीय. पण ओघातच इथं शास्त्राचा विषय येतो की नाही ? आता या सगळ्या उजेडात शास्त्र म्हणजे काय ते बघा म्हणजे झालं !

सूर्यभान काय म्हणाला की मी मुख्यमंत्री होणारच. त्याचा मेंदू पावरबाज असल्यामुळं तो कदाचित यशस्वीही होईल. लोक म्हणणार सूर्यभान यशस्वी झाला. सूर्यभानलाही वाटणार की तो यशस्वी झाला. यातली खरी गोम कुणीच पाहणार नाही. उलट एखादा कुत्सितपणे आपसात म्हणणार -- मराठा होता म्हणून यशस्वी झाला ! पण कुत्सित माणसाला काहीच कळत नसतं हे खरंच आहे.

हे कसं काय लगेच पटलं तुम्हाला ? कुत्सित माणूस मूर्ख असतो. ठीक. मग बॅलन्स्ड माणूस म्हणजे काय ? हे विचारलेलं तुम्हाला आवडणार नाही. कारण अर्थातच स्पष्ट आहे. आता याच्याहून जास्त स्पष्ट करायला लावू नका.

ढोर मेहनत रे बाबा ढोर मेहनत ! आयुष्य म्हणजे ढोर मेहनत ! हातानं, अंगानं केलीच पाहिजे असं नाही. मेंदूनं तर चालूच असते. ही मेहनत बंद म्हणजे संपलंच हो आयुष्य ।

इथं फक्त एक कल्पना सुचवता येईल. तळं कसं शांत असल्यावर त्याच्यावर एकही तरंग नसतो, पण तळं असतं तसं काही शक्य आहे का ? म्हणजे मेंदू आहे, जिवंत आहे, पण ॲक्टिव्हिटी नाही -- असं ? मेंदूची ॲक्टिव्हिटी चालू असताना त्या ॲक्टिव्हिटीनंच काय कळेल ते कळणार पण ॲक्टिव्हिटीच नसताना कुणाला काय कळेल ? ॲक्टिव्हिटीचा कमीजास्तपणा असू शकतो तर मग संपूर्ण अभाव का असू शकणार नाही ?

एखादी व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीला वीष घालून मारते, आपल्या वकीलानं आपली केस जिंकून दिली की आनंद होतो, गुरुजी ३०-४० वर्षांनंतर भेटले तरी आदर दाखवावासा वाटतो, प्रेयसीशिवाय करमत नाही... हे सगळे विषय ठीक आहेत. पण  ते तसले कल्पनाशक्तीचे खेळ नकोत.

आपण ज्याला सत्य म्हणतो ती आपली कल्पनाशक्ती असेल आणि आपण ज्याला कल्पनाशक्ती म्हणतो तेच सत्य असेल -- हा धोका कसा टाळायचा ? शेवटी काय, मेंदूलाच विचारायचं !

*****

## एक्झॅक्ट

एक्झॅक्टली असमतोल कुठे, कसले आणि किती आहेत ते आधी ठरवून घेतलं. आणि मग प्रत्येक असमतोल दूर करण्यासाठी एकेक समिती नेमली. समितीचे सदस्य ठरवतानाही काळजी घेतली. याची वर्णी लावली, त्याची संधी हिरावून घेतली -- असं शक्यतो होऊ दिलं नाही.

मला माहिती आहे. असं मोघमात बोललेलं तुम्हाला चालणार नाही. तुम्ही एक साधे कारकून जरी असलात तरी नेमकं काय करायचं आहे याची क्लॅरिटी आल्याशिवाय काम करता येत नाही हे तुम्हाला माहीत आहे. कुठलीही गोष्ट नेमकी पाहिजे असंच तुमचं म्हणणं असतं. नेमकी म्हणजे मर्यादायुक्त. नाहीतरी मर्यादित कामासाठीच माणसं नोकरीवर ठेवली जातात. नोकरीचंच कशाला, उभ्या जन्माचं पाहिलं तरी यात काय खोटं आहे ?

तर ठीक आहे. नेमकं सांगतो. प्रादेशिक असमतोल तसंच भाषिक, जातीय, आर्थिक, धार्मिक, औद्योगिक असे असमतोल. असे नव्हे हेच. शिवाय एक नामी कल्पना म्हणून सुखदुःखाचा असमतोल. तर हे सर्व दूर करण्यासाठी वरीलप्रमाणे केलं.

थोड्याफार अंतरानं, मागेपुढे सगळ्या समित्यांचे अहवाल आले. सगळीकडे सारखीच समतोल माणसं नसल्यामुळं आणि निरनिराळ्या प्रकारच्या अडीअडचणींमुळं वेळ कमीजास्त लागणं साहजिकच होतं. एकूण विचारी माणसं म्हणाली की एवढं हे होणारंच. इतपत ठीक आहे. विचारी म्हणजे तडजोडवादी नव्हे, तर तडजोडवादी आणि समजुतदार. मला सगळे समानार्थीच शब्द का सुचतायत ? जाऊं दे.

प्रॉब्लेम खरा पुढंच झाला. त्या अहवालांची कार्यवाही करताना. सुचवलेले उपाय कमीजास्त खर्चाचे होते. ते एक चुकलं होतं आणि दुसरं कार्यवाहीची गती. ती सगळीकडे सारखी राहिली नाही. कुणी म्हणालं की अमुक समितीतल्या सदस्यांनी स्वस्तातले उपाय सुचवण्यासाठी पैसे खाल्ले ! अमुक अमुक असं तुम्हाला चालणार नाही. समजा भाषिक समितीबद्दल बोललं गेलं. समजा सुध्दा नको, भाषिकच. कुणी म्हणालं की जास्त विकसित भागांवरचा खर्च वाढवायचा होता म्हणून समित्यांची नाटकं करून थोडाथोडा पैसा इकडं टाकला एवढंच ! आम्ही काय भिकारी आहोत काय -- असं एकजण संतापून म्हणाले. आरोपप्रत्यारोप सगळ्याच समित्यांबद्दल झाले. खूप आरडाओरडा झाला. समित्यांची पुनर्रचना करण्याची मागणी झाली. समित्यांच्या कामकाजावर देखरेख करून त्यांच्यात असमतोल राहू नये याची काळजी घेण्यासाठी आणखी एक समिती असावी अशी मागणी आली.

सरकार म्हणजे शासनयंत्रणा जरी असली तरी सहन किती करणार ? काहीही केलं तरी त्याला चांगलं म्हणायचंच नाही आणि त्यातल्या चुकाच काढायच्या असा चंग बांधलेल्या खत्रुड विरोधकांना किती महत्त्व देत बसणार ? देशहिताचं काही केलं तरी हे विरोधच करणार ! म्हणजे मग यांना देशद्रोही का म्हणू नये ?

कामकाज एक्झॅक्ट होतं. आरोप एक्झॅक्ट होते. मतभेद एक्झॅक्ट होते. संबंधित सगळी माणसं एक्झॅक्ट होती. म्हणजे क्लॅरिटी असलेलीच होती. त्यामुळं फार प्रॉब्लेम होत चालले.

तुमचं म्हणणं असं की, कुठलीही माहिती न वगळता मी सगळी माहिती द्यावी. अहो पण इतकं सविस्तर मला महत्त्वाचं नाही वाटत. तुम्ही म्हणणार ते आम्ही ठरवू. महत्त्वाचं आहे की नाही ते. म्हणजे मी सगळं सांगू शकतो आणि सांगेन याच्यावर तुमचा विश्वास आहे पण ते महत्त्वाचं नाही हे मी म्हणतोय याच्यावर नाही ! म्हणजे तुम्हाला माझा तुमच्या मर्जीप्रमाणे वापर करायचाय ! मला तुमची बऱ्यापैकी भीती वाटल्याशिवाय मी हे होऊ देणार नाही.

माझा एक मित्र आहे. नवोदित कवी आहे. नवोदित म्हणण्यामागे त्याला कमी लेखण्याचा उद्देश नाही. पण तो नवोदितच आहे त्याला मी काय करणार ? नवोदित आणि जुन्या कवींमधला असमतोल हा विषय नका काढू. तो काय म्हणतो की मी म्हणजे त्यानं आतापर्यंत सात कविता लिहिल्या आहेत आणि आता यापुढे तो कविता लिहिण्याची शक्यता नाही. तर तो किती वर्षं नवोदित राहील ? मी म्हटलं नवोदितसुध्दा राहण्याची शक्यता नाही. तर त्याला राग आला.

खरं म्हणजे कलावंतच याच्यावर मार्ग काढू शकतील. एक्झॅक्टपणापासून जास्तीत जास्त स्वातंत्र्य घेणारी ही जमात असते. एक्झॅक्ट लोकांचं काय होतं ते आपण पाहिलं. आता यांना संधी देऊन बघावं. काही कलावंतांनी याला नकार दिला तर लोक त्यांना घाबरट म्हणाले. आव्हानं पेलायला तयार होत नाहीत ते कलावंतच काय पण काहीच होऊ शकणार नाहीत -- असं म्हणाले. एक्झॅक्ट सत्यच !

*****

# कुणीच कधीच

कुठलीही पंचाईत करायची नाही आणि कुठल्याही पंचनाम्यात पडायचं नाही असं ठरवलं होतं. ठरवलेलं पाळतही होतो. पण नेहमीच सगळं आपल्या मनावर राहू शकेल असं काही नाही. एखादी वेळ अशी येते की आपण ठरवलेलं सोडून द्यावं लागतं. न सोडल्यास आपलं फारच नुकसान होऊ शकतं. त्यामुळं असं काहीतरी ठरवण्याचं प्लॅनिंग करणं जितकं महत्त्वाचं असतं तितकंच त्याला मुरड कधी घालायची हेही वेळोवेळी समजावं लागतं. त्यातही एवढी जडतोड करायची काही गरज नव्हती किंवा काय करेक्ट डिसिजन घेतला, वगैरे मतं ऐकावी लागतात. आणि आपण मुरड घालायची खरंच गरज होती का आणि आपण ठरवलं त्याला आपण चिकटून राहिलो असतो तर जास्तीत जास्त काय झालं असतं -- असे विचार आपल्याही डोक्यात येतातच.

उदाहरणार्थ वरिष्ठाला फारसा विरोध करू नये. म्हणजे जितकं बिनविरोध चालवता येईल तितकं ठीक -- हेच एक तत्त्व घ्या. हे तत्त्व कितपत कसं चालवायचं हे वरिष्ठावर अवलंबून असतं. आणि मुख्य म्हणजे आपल्यावर. यात एक गृहीत धरलेलं आहे की त्याच्या ताटाखालचं मांजर होण्यासारखी आपली परिस्थिती नाही. तशी असली तर वेगळं तत्त्व वापरावं लागेल. पण तसं नसलं तरी फार नम्रपणा अंगाशी येऊ शकतो. मग प्रतिकाराचं प्रमाण किती ठेवावं असा प्रश्न येतो. आपण वरिष्ठांशी भांडणारे आहोत अशी तर आपली प्रसिध्दी किंवा कुप्रसिध्दी होता कामा नये पण तोसुध्दा जरा वचकून राहिला पाहिजे. म्हणजे त्याला असं वाटलं पाहिजे की हा माणूस सटकू शकेल पण नेमकं कधी ते सांगता येत नाही. आपल्याइतकीच डाऊटफुल पोझिशन त्याची करणं हे महत्त्वाचं आहे. म्हणून मग असा विचार येतो की प्लॅनिंगला फारसा काही अर्थ नाही. ही एकूण जनरल समज घेऊन वागत राहावं. मग होईल ते होईल. ते मात्र निर्भयपणे फेस करावं. फार तर ते फेस करताना तोंडाला फेस आला तर ? -- हा प्रश्न मनात ठेवावा. वगैरे.

माझं एक मत आहे, पटेल न पटेल, पण स्त्री ही पुरुषापेक्षा जास्त शारीरिक असते. उत्सव, खाणंपिणं, थट्टामस्करी, कपडे, मिळालेल्या पैशांचं काय केलं, कुणाचं वागणं कसं चुकलं किंवा बरोबर होतं -- अशा विषयात स्त्रियांना इंटरेस्ट जास्त. शारीरिक आयुष्य धरुन जगता येऊ शकतं -- हा विश्वास त्यांच्याइतका पुरुषाला नसतो. त्यामुळं अंधश्रध्दानिर्मूलनाला स्त्रियाच योग्य. पण दिसायला असं दिसतं की त्याच अंधश्रध्दा टिकवतात.

एक लक्षात घ्या. हा सगळा स्त्रियांच्या बुध्दीचा गौरव चाललाय. त्यांना कमी लेखणं नव्हे. हे सांगायची वेळ कुणामुळं येतेय पण ? कदाचित् हे कळलं नाही तर या माझ्या भीतीमुळं असेल. पण असं होणारच नाही. त्यांच्यांत जेवढी उत्स्फूर्तता असते तेवढी पुरुषांत नसते. फक्त त्यांची उत्स्फूर्तता ही शारीरिक स्तरावरची असते इतकंच. पण तीसुध्दा नसते नं पुरुषांत. ते वेड्यांसारखे विचार करत बसतात.

मनुष्य हा एकच प्राणी असला तरी नर आणि मादी यांचा पॅटर्न वेगळाच असणार असं मला वाटतं. म्हणजे मानसिक पॅटर्न म्हणतोय मी. अगदी टोकाची चूक म्हणजे सगळंच मी म्हणतोय त्याच्या उलट असेल पण फरक असतो यात फरक पडणार नाही.

साहजिकच कुणीही विचारेल की मला वाटणारं स्त्रीचं आकर्षण तरी नीट आहे का ? त्यावेळी तरी हे विचार डोक्यात न येता स्पष्टपणे मी आकर्षित होतो की नाही ? हे तुम्हाला सांगून काय उपयोग ? आणि या बाबतीत साक्षी काढायची पध्दत नाही.

म्हणूनच मी पंचाईत, पंचनामा आणि साक्ष यांच्या विरोधात आहे. साक्ष हे मघाशी म्हणायचं राहिलं होतं. पण ते आहेच. तितकंच महत्त्वाचं.

मी रिटायर झालो तेव्हा मला किती जणांनी किती फुलं दिली याला गणतीच नाही. भाषणं तुम्ही ऐकायला हवी होतीत. मग तुम्हाला कळलं असतं की मी इतकं डळमळीत डळमळीत का चालत होतो. आणि ते किती  सगळ्यांच्या आणि संस्थेच्या हिताचं होतं !

पण माझ्या या सगळ्या बोलण्यावरून तुम्हाला वाटेल की मी एक पाचपोच नसलेला, तत्त्वहीन आणि वारा येईल तशी पाठ फिरवणारा माणूस आहे.

पण तसं कुणीच मला कधीच म्हणालं नाही. त्याचं काय ? उलट ते मला एक तत्त्वशील आणि चांगला माणूस म्हणाले !

*****

# कुठं काय

मित्र मित्राला म्हणाला की तू बदललायस. पहिल्यासारखा वागत नाहीस. तो म्हणाला तूही बदललायस. पूर्वीसारख्या आपल्या भेटीगाठी, बसणंउठणं होतच नाही. मग दोघंही म्हणाले आपण दोघंही बदललोय. सगळं बदलतच चाललंय त्याला आपण तरी काय करणार असं दोघांनाही वाटलं.

कॉलेजच्या पायाऱ्यांवरून उतरलं की एक छोटा रस्ता. फुलंपानंझाडं. मग हळूहळू गजबज वाढायची. आणि पुढं खूप रहदारीचा मोठा रस्ता. सिग्नल्स.

करीयर कशात होणाराय हेही माहीत नव्हतं. मार्ग सापडल्यावर मग प्रगती केली. परिश्रम केले. आपल्या क्षेत्रात आपण निरुपयोगी ठरता कामा नये हे पाहिलं.

मग बदललं काय ?

या जगात जगत राह्यला स्मरणशक्ती आणि विचार यांव्यतिरिक्त साधनं नाहीत. अंगमेहनतीची कामं करणारे फार तर शरीर हे एक साधन ॲड करतील. विचारानं ठरवत ठरवत जावं लागतं हे एकदा नक्की असलं आणि आपण निरुपयोगी होता कामा नये हे दुसरं एक नक्की असलं की परिस्थितीवशात विचाराचा जास्तीतजास्त आणि अधिकाधिक वेगानं उपयोग करणं आलंच. ते आहे. तेच चालू असतं. फक्त परिस्थितीचा विस्तार वाढतो, तपशील वाढतात आणि त्यामुळं गती वाढवावी लागते. हे एवढं कळल्यावर शांत झोप लागते असं थोडंच आहे ? झोपेतही विचार थांबत नाहीत. डास चावलेलेही कळत नाहीत. त्याच्यात मधेच इन्फ्लूएन्झा वगैरे होऊन घरी बसावं लागणं म्हणजे वेड्यासारखं होतं. वेळ वाया जातो, करमत नाही आणि अस्वस्थ होतं.

त्यात परत वेगवेगळे प्रश्न असतात. बायकोशी न पटणं, मुलांची शिक्षणं, बाहेरचे प्रश्न, सगळे माजलेत साले,वगैरे. कुणाकुणाशी वाद घालण्यातही कधीकधी वेळ जातो. मनस्ताप आणि निरुपयोगीपणा आणि मनस्ताप.

विचाराचा फक्त उपयोगी उपयोग कायम करता आला पाहिजे. प्रगती जास्त होईल. आणि मुख्य म्हणजे त्रास कमी होईल. असं वाटतं.

विचाराचं वाईट एकच आहे. सारखं प्रेशर असतं. थकवा येतो. हा कदाचित विचाराचा नसेल दोष. त्याचा उपयोग झाला पाहिजे या हट्टीपणाचाही असेल. पण साधं, सरावाचं एखादं काम करताना कशाला हवाय हा हट्टीपणा ? पण असतो. तो प्रसरण आकुंचन पावतो, पण असतो.

मी त्यांना सांगितलं होतं की मी गेल्या कित्येक वर्षांत काही खेळलेलो नाही तर टीममध्ये माझं नाव नका टाकू. ते म्हणाले की क्रिकेटमध्ये शक्यतो अकरा लागतात. त्यांचे अकरा झालेत. आपलेही हवेत. म्हटलं ठीक आहे, चला. म्हटलं सोशल इव्हेंट आहे, सारखं नाही-नाही म्हणणंही बरं नाही. म्हणून हो म्हणालो. आणि सालं ते काही बहुतेक झेपलं नाही बॉडीला. हार्टॲटॅक आला. काय भावात पडलं ? विश्रांती घ्यावी लागली. किंवा ते एक निमित्त झालं असं म्हणू हवं तर. आता ज्यांनी आग्रह केला त्यांची मनं दुखावण्यात तरी काय अर्थ आहे ? त्यांचा उद्देश वाईट थोडाच होता ? प्रेमानं तर म्हणाले होते ते. पण या सगळ्या प्रकारात विचाराचं क्षेत्रच बदललं. दुसरेच विचार करावे लागले. त्यांच्यात पुढं कहर म्हणजे अध्यात्मिक पुस्तकं वाचू लागलो आणि तशा विषयांवर चिंतन करू लागलो.

हा बदल मला आवडेल का असं तो क्रिकेट सामना व्हायच्या आधी मला विचारलं असतं तर मी नाही म्हणालो असतो.

मला हट्टीपणाला आवर घालावा लागतो याचं खरं तर मला फार वाईट वाटतं. पण जास्त वाईट वाटणंही चांगलं नाही म्हणून त्यालाही आवर घालावा लागतो. नाहीतर याच्याहून पुष्कळच जास्त उपयोगी करू शकलो असतो मी आयुष्य, म्हणजे पैसा जास्त कमावला असता असं माझं म्हणणं नाही. कमावलाही असता कदाचित पण आपल्याला उपयोगी वाटत राहणं हे त्याच्याहून जास्त महत्त्वाचं आहे.

सारखा थकवा येतो. माझ्या इच्छेप्रमाणे परिस्थितीच नाही. सगळं बदललंय. त्याप्रमाणे ॲडजस्ट होत आता आहे यात आपल्याला कसं जास्त उपयोगी वाटेल हे पाहतो.

हेच तर करतोय इतकी वर्षं ! कुठं काय बदललंय ! तसं म्हटलं तर !

*****

# चालणं

इतकं उन्हातून कधी चालावं लागलं नव्हतं. लहानपणी चाललो असेन पण नंतर नाही. वातानुकूलित कॉम्प्यूटररूममध्ये बसून काम करणारा मी !

नाहीतरी अनुभवाच्या आणि माहीत असलेल्या जगातच प्रत्येकजण असतो. एखादं वाण्याचं दुकान असलेल्या माणसाला एकदम दवाखान्यात बसवून डॉक्टरचं काम कर म्हटलं तर येईल का त्याला ? त्या बाजूचं शिक्षण नाही, सराव नाही, विचार नाही, कसं जमणार ? अहो, पण डॉक्टराडॉक्टरातही फरक असतात. एक चांगला असतो. एक वाईट असतो. यशस्वी किंवा अयशस्वी असतो. हो, पण यातलं काहीही असण्यासाठी मुळात त्या मार्गानं तो गेलेला असलाच पाहिजे नं !

म्हणजे माहिती असणं महत्त्वाचं आहे पण तिचा उपयोग ज्याच्यात्याच्या कुवतीप्रमाणेच होणार. याचा अर्थ मग असाही लावायचा का की अंगारा देणाऱ्यांनाही डॉक्टर म्हणा.

तुम्ही मागे पडताहात. दुसरे पुढं चालले. थांबू नका. हे वाचा, ते वाचा. याचा विचार करा. त्याचा आधी विचार करा. विश्लेषण करा. काही आकडे बदलून काय परिणाम होतोय पाहा. यातलं तुम्हाला काय शक्य आहे ते पाहा. या सगळ्याचे निष्कर्ष अंमलात आणा. आणि वेगानं ! फार विचार करत बसलात तर मागं पडाल. कमी विचार केलात तरी मागं पडाल ! दुसरे पुढं जातील ! आणि मग नष्ट होण्याशिवाय तुमच्यापुढे मार्ग उरणार नाही !

मला एक सवय आहे. पक्ष्यांच्या आवाजानं मला पहाटे जाग येते. गजरबिजर काही गरज नाही. हे असं फायद्याचं आहे की तोटयाचं ? असा प्रश्न आला की मला वाटतं, माझे विचार भरकटत चालले ! कशाचा विचार करायचा, कशाचं विश्लेषण करायचं, त्यासाठी कोणत्या गोष्टी निवडणं महत्त्वाचं आहे -- हेही कळलं पाहिजे. आता यात थोडेफार मतभेद होतील पण त्यातही कुणीतरी जास्त बरोबर असेलच. जास्त बरोबर म्हणजे जास्त पॉवरवाला. पर्सनॅलिटी चांगली पाहिजे. मुलांना नाटयशिक्षण-शिबिरात घाला. पोहायला पाठवा. मागं पडायचं नाही हे महत्त्वाचं !

ही सगळी माहिती सगळ्यांना आहे. विचारही सगळे करतायत. तरी तुमची संस्था का मागं पडलीय ? मला वाटतं, कारणांचं विश्लेषण करता येईल, पण आमच्या माणसांचं स्टँडर्डच जरा कमी तर नसेल ? समजा विश्लेषणातून असं निघालं की आपल्याकडे एलबीडब्ल्यू जास्त होतात. तो एरिया सुधारला पाहिजे. सरावानं सुधारला. तरी असं का ? मग समजा, काढलं की जिद्द कमी पडते. जिद्द का कमी पडते ?

वारंवार उन्हातनं चालणाऱ्यांचा मला आदर वाटून उपयोग काय ? पण उन्हातनं चालण्याच्या बाबतीत तुलना करायची असा प्रसंग आला तर मी काय करणार ? समजा मीही उन्हातनं चालणाराच असलो पण मागं पडलो तरी काय करणार ? जागतिक स्तराच्या खेळाडूप्रमाणे चपळ आणि फिट राहणं हा एक मार्ग आहे. तो करू ?

म्हणजे साहजिकच कुणीही म्हणणार, समजलं. आपल्या कुवतीप्रमाणे तुम्ही प्रयत्न करायला तयार आहात पण त्याच्यापुढच्या अपेक्षा फोल ठरतील असा निराशावादी दृष्टिकोण तुम्हाला घ्यायचाय. पंगू माणूस डोंगर ओलांडतो, असाध्य तेही साध्य होतं याच्यावर तुमचा विश्वास नाही. तुम्ही आशावादाचं प्रमाण फारच वाढवायची गरज आहे. त्याशिवाय तुमच्याकडून अपेक्षित रिझल्टस् येणार नाहीत. आणि इतकं सगळं करूनही समजा सगळं फेल गंलं आणि व्हायचं तेच झालं तर काय करणार ? तुम्ही आपोआपच नष्ट व्हाल. त्यापेक्षा काय करता येईल ते पाहा. नियमात बसवून थोडे वेडेवाकडे मागै हाताळलेत तरी चालेल. सुचणं आणि अंमलात आणणं हे महत्त्वाचं आहे. अशावादानं, पूर्ण कुवतीनं, दिवस रात्र वगैरे न बघता हे करत राहणं महत्त्वाचं आहे. तुम्ही कामाच्या तासांचा विचार केला आणि दुसऱ्यांनी केला नाही म्हणून ते पुढं गेले असं नंतर निघायला नको, असं जगायचं नसेल तर तुम्ही जगूच शकत नाही. उपाशी मराल. आता उपाशी मरणं चांगलं की अशी कामाची आव्हानं पेलत मरणं चांगलं हे तुम्ही ठरवा.

एखाद्या उंच हवेच्या ठिकाणी ट्रिपला जावंसं वाटतंय, पण नको. भूक लागलीय, पण नको. एवढं संपवून पाहू. ताप आलाय, पण एवढं काम होऊन जाईल.

संपूर्ण समाज अशा गधडेपणात स्वतःला का गाडून घेतो याचं विश्लेषण कधी करणार ? की विश्लेषणातनं आधीच सिध्द झालंच की हेच जगणं ? मला यातलं खरंच काही कळत नाही या माझ्या दोषाला जबाबदार फॅक्टर्स कुठले ? रिसर्च व्हायला हवाय.

*****

## भरभराट

"तुम्ही काय करता ?"
"मी एक लेखक आहे."
"म्हणजे, कमर्शियल लेखक असणार. कारण दुसरं काहीतरी करून लेखक असलेला माणूस फक्त लेखक असं पहिल्यांदा सांगू शकत नाही. "
"कमर्शियल आणि नॉन-कमर्शियल दोन्ही लिहितो. "
"नॉन-कमशियल मध्ये काय लिहिता ?"
"जरा गंभीर. म्हणजे आपल्याला सीरीयसली जे महत्त्वाचं वाटतं ते. यात करमणुकीचं पर्सेंटेज जरा कमी असतं."
"किंवा असं ज्यांना आवडतं त्यांच्या करमणुकीचं पर्सेंटेज जास्त असतं असं म्हटलं तर ?"
"चालेल. पण असे लोक कमी असतात. त्यामुळं त्याची कमर्शियल व्हॅल्यू कमी असते."
"शिक्षणानं वगैरे असे लोक वाढू शकतील. "
"शिक्षणाला पर्याय नाही हे तर आहेच. "

" तुमच्या सीरीयल्स वगैरे मी पाहिल्यायत. "
" ते सगळं कमर्शियलच ठेवावं लागतं. सगळ्यांसाठी असतं ते."
" पण जे नॉनकमर्शियल असतं ते तुम्हाला इकॉनॉमिकली परवडतं का ?"
" मला परवडायचा फारसा प्रश्न येत नाही. फक्त ल्याह्यचं तर असतं ! पण प्रकाशक वगैरे नाराज असतात. पुस्तकं खपत नाहीत. चाळीस चाळीस, पन्नास पन्नास टक्के कमिशन देऊन पुस्तकं विकावी लागतात. विक्री जी काय होईल त्याच्या वसुलीलाही चकरा माराव्या लागतात."
" म्हणजे लोकांचं शिक्षण सुधारणं आणि त्यांनी अशी पुस्तकं विकत घेणं हे झाल्याशिवाय सांस्कृतिक प्रगती होणार नाही. "
" शिकलेल्या लोकांनाही वेळ नाहीय !"
" मग याच्यावर काय उपाय ?"
" भौतिक प्रगतीला जो भयानक वेग येत चाललाय तो कमी झाला पाहिजे."
" तो कसा कमी होणार ?"
" सीरीयस वाचनानं कळू शकेल लोकांना, की आपण कुठेतरीच धावत सुटलोय."
" पण लोकांना तर वेळ नाहीय."
" ते आहे म्हणा."

" ज्या काळात कलेची भरभराट व्हायची थांबते तो काळ इतिहासातसुध्दा चांगला समजत नाहीत. "
" हे बरोबर आहे. पण पुस्तकं तर निघतायत. चित्रपट, नाटकं, कथा, कादंबऱ्या निघतायत."
" समजा आत्ता तुकाराम असता तर काय झालं असतं ?"
" तुम्ही त्याला विचारलं असतं की तुम्ही काय करता आणि तो म्हणाला असता की अभंग लिहितो, भक्ती करतो आणि एक दुकान चालवतो."
" पुढं मी विचारलं असतं की भागतं कसं तुमचं ?"
" तो म्हणाला असता ओढाताण होते."
" बास ? मग कलेचं काय ?"
" माझ्या अलिकडं एक लक्षात यायला लागलंय. आपल्याला सगळं फिक्स्ड् आणि लिमिटेड करायचंय आणि तसंच सगळं आहे असं धरून चालायचंय. एखादा प्रश्न सांगितला तर आपण म्हणणार सोल्यूशन काय ? कलावंत हा आयुष्याच्या अनिश्चिततेचा वेध घेईल असं आपल्याला वाटतच नाही. किंबहुना तसं काही नसतंच हे आपलं नक्की ठरलेलं असतं. त्यामुळं कला ही कमर्शियलच असली पाहिजे असं आपल्याला वाटतं. लहानपणी कैऱ्या पाडल्या, मोठेपणी नोकरी केली, म्हातारपणी नातवंडं खेळवली -- असं आपल्याला नक्की लागतं."
"सांगता येत नाहीत अशा गोष्टींचं नाहीतरी करणार काय ? आणि तुम्हाला समजतंय पण सांगता येत नाही असं

काय असणार आहे ?"
"अशा विचारांनी कलेचा नायनाट होतोय."
"आणि तुम्ही कमर्शियल लिहिता त्यानं काय होतंय ?"

"सगळं असं फिक्स्ड आहे का आणि असेल तर खरं काय, चांगलं काय असे मलाही प्रश्न पडतात."
"तुम्ही ते सोडून देता. कलावंत सोडून देत नाही. तो पाहात जातो."
"पण करणार काय तो ? कमर्शियल किंवा नॉनकमर्शियल लिहिणार. खपणारं किंवा न खपणारं. न खपणारं लिहून तरी काय उपयोग ?"
"मला तरी कुठं काय दिसतोय मार्ग ? फक्त एकच वाटतं की कमर्शियलमध्येच नॉनकमर्शियल कंटेंट घालता आला पाहिजे. म्हणजे कमर्शिअल म्हणून ते खपेलही आणि ज्यांना नॉनकमर्शियल कंटेंट हवाय त्यांना तो मिळेलही. "
"नॉनकमशिर्यल कंटेंट मागणारे आहेत कुणी ?"
"ती शंकाच आहे. "

अमुकतमुकचा छापलेला कवितासंग्रह पडून आहे.
याचे पुस्तक कॉलेजात लावले म्हणून खपले.
त्यानं लेख बरेच लिहवून आणले.
कामगारवर्गाचा तो खरा प्रतिनिधी आहे.
दलितांची दुःखं इतक्या प्रभावीपणे क्वचितच कुठं आली असतील.
आधुनिक जीवनाच्या गुंताड्याचे लोभस दर्शन.
वैमानिकाच्या जीवनावरची जीवघेणी कादंबरी.
मनोमन हरखून जावे अशी हळुवार कविता.
यांच्या वाङ्मयाचे अलौकिक विलोकन.
मराठी साहित्याला नवी दिशा देणाऱ्या कथा.
आधी सीरीयल आणि मग कथा.
सेक्सची खुलेआम चर्चा.
सगळे मातब्बर पुन्हा एकत्र.
तुमचेआमचे प्रश्न चितारणारे आजचे नाटक.
भारतीय राजकारणावर प्रखर प्रकाशझोत.
उद्याच्या जगाचे आज दर्शन.
मराठी मातीतली मराठी कथा.

"तुम्हाला कधी कंटाळा येतो ? "
"नाही."
"तुम्हाला सगळं इंटरेस्टिंग वाटतं ? "
"नाही."
"मग ?"
"मला विचारायचं कारणच काय पण ? मी कलावंत आहे."
" काय फरक पडतो ? त्यामुळं ? "

*****

# चोथा

माझं काहीच म्हणणं नाही. नको म्हटलं तर राहिलं. कारण त्यांचं म्हणणं असं की दुसऱ्याच्या वागण्यानं तिसऱ्याला त्रास होणं हा विषय चावून चोथा झालेला आहे. असं होतच असतं. त्याला काय करणार ? पण म्हटलं, त्रास होतो, मनस्ताप होतो आणि हे नको असं वाटतं -- हे तरी खरं ना ? मग इकडंतिकडं धावपळ करण्यापेक्षा एक साधा प्रश्न तरी पडायला नको का की हे असंच जगावं लागणार की याच्याशिवाय जगता यईल ? दुसरं असं की कुणाच्या वागण्यामुळं कुणाच्या मनाची काय स्थिती झाली हे नुसतं सांगून काय उपयोग ? म्हणजे कोण कसं वागलं असतं म्हणजे जगणं कसं चांगलं झालं असतं असं काही तुम्ही सांगू शकता काय ? मग तुम्ही चावून चोथा कशाचा केलाय ? जे तेच तेच असतं तेच फक्त चोथा सिस्टिममध्ये बसतं ! पण या वाक्याबद्दल तुम्ही डाऊट घेणार हे नक्की ! कारण नाहीतर चोथा कशाचा करायचा हा मेन प्रॉब्लेम येईल ! आणि तो येईल तो येईल, शिवाय भीती वाटेल ! आहे ते नष्ट तर होणार नाही ही भीती ठीक आहे पण मुळात काही आहे तरी का -- हे म्हणजे फारच भयानक होईल.

साधं नुसतं बसा. तुमचं माझ्याकडे काही काम नाही. माझं तुमच्याकडे नाही. शिवाय आपल्यात समान आवडीचे विषय नाहीत. आता फक्त भेटलोय तर काही तरी बोललं पाहिजे. नाही तर तुम्हाला किंवा मला काय वाटेल हे दोघांनीही सोडून द्यायचं.

दुपारच्या वेळी शहरातल्या बागेत झोपलेले कष्टकरी पाहिलेयत ? हे कधी झोपले ? किती वेळ झोपतील ? झाडांच्या पानांना बाजूला करत खाली पडणारे कवडसे असेच्या असे किती वेळ राहतील ? अर्थात असले प्रश्न उपस्थित करून मला काही निसर्गचक्राची महती गायची नाहीय. मग हा प्रश्न आलाच कशाला हे तुम्ही विचारल्याशिवाय राहणार नाही.

नाही. मी शहाणा नाही. एवढंच नाही तर कुणी शहाणा असूही शकत नाही. आणि हेच महत्त्वाचं आहे. हे मी कशावरनं म्हणतोय ? आणि अशी ठाम वाक्यं देणारा मी कोण ? हा प्रश्न तर कुणालाही म्हणजे कुणाच्याही बाबतीत विचारता येईल. विचारला पाहिजेच. पुन्हा वाक्य ! म्हणून म्हटलं साधं नुसतं बसू.

आपण म्हणतो अमुक अवघड आहे आणि तमुक सोपं आहे. मोजून छप्पन्न प्रॉब्लेम्स मनात ठेवणं, आलटून पालटून त्यांच्यावर विचार करणं, सोल्यूशन्स निघत नाहीत म्हणून वैतागणं, थोडक्यात म्हणजे एकूण स्वतःचा चुथडा करून घेत राहणं हे तसं सोपंच वाटतं. कारण ते आपोआप होतं. ते होतच राहतं. स्वतःचे हाल करण्यासाठी म्हणून केवळ काही श्रम घ्यावे लागत नाहीत. " अवघड आहे " असं म्हणणंही तसं सोपं.

समजा क्ष नं आपल्या मनाविरुध्द वर्तन केलं आहे. ते आपल्या तत्त्वांच्या तर विरुध्द आहेच पण मुख्य म्हणजे आपल्याला अपमानास्पद आहे. शिवाय हे आपल्याला असं वाटेल याची कल्पना त्याला दिलेली असून ! म्हणजे यात आपल्याला न जुमानणंही आहे. तर आपण काय म्हणणार एक तर सगळा राग शक्य असलं तर दाखवून टाकू किंवा आपल्या वागण्यातून नाराजी दाखवत राहू. तासंतास, दिवसेंदिवस. बोलायचंच नाही. किंवा अगदी कमी बोलायचं. मन असं ब्रेक्स आवळल्यासारखं ताणलेलं ठेवायचं. स्वतःच्या वागण्यामुळं आयुष्यात हा अनैसर्गिकपणा आला हे क्षला कळलं पाहिजे. पूर्वी असं नव्हतं हे जाणवलं पाहिजे.

सकाळ झालीय. गुलमोहोराच्या अर्ध्या झाडावर ऊन पडलंय. अर्ध्यावर नाही. त्या झाडाखालून रिक्षा जातायत, माणसं जातायत. आणि अचानक एक जगद्विख्यात सायंटिस्ट त्या झाडाखालून जाऊ लागतो. झाड त्याला म्हणतं तू जर सायंटिस्ट आहेस तर मी कोण आहे ते सांग. तो म्हणतो जगात इतरत्र या विषयावर झालेलं संशोधन आणि आपल्या देशात झालेलं संशोधन यात तफावत आहे. आपल्या देशात या प्रकारच्या संशोधनाची परंपरा नव्हती.

निसर्गापुढे माणूस ठेवून निसर्गाचं उदात्तीकरण आणि माणूस कःपदार्थ असं करण्यात मला कवडीचं इंटरेस्ट नाही. पण क्ष समोर आला की नाराजीची पोझ घेणं आणि तीही सीरीयसली हे हळूहळू मला स्वतःचा छळ वाटायला लागतं आणि कंटाळवाणं वाटायला लागतं. आणि दोघंही जितकी वर्षं जिवंत राहू तितकी वर्षं हेच ? न्याय मिळवण्यासाठी

पंधरावीस वर्षं कोर्टात चकरा मारायची पध्दत याच्यावरूनच पडली असावी. हेही एक वेळ होत राही ना का पण मन अशी परंपरा चालवत राहतं हे फार खत्रुड वाटतं.

नाही, ते बरोबर आहे. प्रत्येकाचं क्षेत्र वेगळं असतं, कामं वेगळी असतात. ज्या समाजात यशस्वी लोकांचं प्रमाण जास्त असतं तोच समाज चैतन्यानं रसरसलेला असतो. इथं उलटं आहे. इथं यशस्वी माणूस अयशस्वी माणसाची कड घेतो आणि म्हणतो की देशातल्या सामान्य माणसाचा विचार आधी केला पाहिजे. अशा कडेच्या कडेकडेनंच तो यशस्वी होत गेलेला असतो.

राक्षसाचं चित्र असलेला शर्ट मी या वयात वापरणं बरं दिसतं का ? लाकडी खोकी एकावर एक रचून ठेवली आणि शिवाय अशा बऱ्याच रांगा आणि विचारलं की यातल्या कुठल्या खोक्यात फ्रुटजॅम आहे ते सांगा तर आला की नाही पुन्हा खोकी उघडून पाह्यचा प्रसंग ! पण मला जॅम नको आहे. मी कुठलेही कपडे वापरीन. मी कुठंही जाईन. काहीही करीन. रुळावरून पळत जाणारी सगळी जनावरं मी एकट्यानं थोडीच पाळलीयत !

आणि तुम्ही म्हणता कंटाळा येतो. नवं काही असलं तर बोला. वगैरे. प्रत्येक माणूस वेगळा असल्यामुळं वेगळं वेगळं सांगता येईल हो, पण नवं कुठलं काय सांगू ? ।

आपला मूळ विषय काय होता ? चोथा. त्याच्यावरनं खरं तर सुरुवात झाली. तिथून आपण आलो कुठं तर मी जबाबदार नाही इथपर्यंत. आणि शेवटी इथपर्यंत जर पटत असेल तर जास्त पुढं जायची गरज नाही. उगीचच विषयानं विषय आणि शब्दानं शब्द वाढत जातो. हे टाळावं शक्यतो.

छे, छे ! आत्ताच्या आत्ता काही घडायला हवंय असं काही नाही. ते सावकाशीनं पाहता येईल. गडबड नाही. कारण आपण आहोत घाईत. हे एकदा निपटू द्या, मग पाहू. म्हणा --

चोथ्यात चोथा भाजीचा
बटवा माझ्या आजीचा.
आणि एक पाऊल उडी मारून पुढं चला.

*****

# पुष्कळ कितीतरी

" कुछ तो मीनिंग होगा यार इसका " एवढं बोलून तो निघून गेला.

हं--हळू--हं--इकडून--हळू--काच जप--हं--जरा उजव्या साईडनं उचल--हं--थांब थांब थांब -- टेकव जरा -- आस्सं--जरा साईड बदल-- तू इकडं ये--तिकडून जास्त उचलावं लागेल आता-- मी तिकडे जातो--

--अस्सं चाललेलं अस सारखं मनात. आणि मला वाटतं की सगळ्यांची मनं अशीच असतील. सगळे माझ्यासारखेच नॉर्मल आहेत असं समजून मी वागतो. नॉर्मल वागणं म्हणजे काय तर दुसऱ्यांना आपण अब्नॉर्मल न वाटणं.

आमच्या घरातल्या सगळ्या वस्तू मला ओळखता येतात पण अचानक यादी दे करून न बघता -- म्हटलं तर जमणार नाही. नाही जमणार. किती आहेत वस्तू ? तर आकडाही नाही सांगता येणार. क्वचित् काही वस्तूंचे रंगही आठवणार नाहीत. आणि प्रत्येक वस्तू या घरात कधी आली तेही सांगता येणार नाही. सगळ्या वस्तूंना जर मनं असती तर तीही मला फारशी ओळखता आली नसती. त्यांच्या अपेक्षांचे फार प्रॉब्लेम्स झाले असते. माझेच इतके व्याप आहेत. काय काय करू ? पण तरी दखल घेतो मी प्रत्येक गोष्टीची. टीव्हीवर ज्याची मुलाखत चाललीय तो माणूस कसा मधूनच झाडाझुडुपांतून फिरताना दाखवतात संथपणे आणि तो कसा मधेच कुठल्यातरी झाडाच्या पानांना स्पर्श करतो तसंच थोडीफार दखल मात्र मी घेत असतो. म्हणजे त्यांना मनं असती तर त्यांनीही हे मान्य केलं असतं. नाहीत मनं तेच बरं आहे. मनं असतात तशी नॉर्मल पण प्रॉब्लेम्स फार करतात. आपल्याला प्रॉब्लेम्स आवडत नाहीत. त्रास होतो म्हणून. प्रॉब्लेम म्हणजे आव्हान. पीपल लाईक यू शुड ॲक्सेप्ट चॅलेंजेस असं आमचे साहेब म्हणतात मला. त्यांचं मत बरं आहे माझ्याबद्दल. ते म्हणतात मी कामाला चांगला आहे. नॉर्मल मनाचे आहेत ते.

आता खरं तर ती घटना घडली तेव्हा मी तिथे नव्हतोच. पण आश्चर्य म्हणजे तक्रार माझ्याबद्दल झाली. मी परोपरीनं सांगतोय पण कुणी ऐकायलाच तयार नाही. शेवटी  तर च्यायला त्यांनी मी तिथंच होतो आणि मी तोच हे सगळं सिध्द करायचा धाट घातला. बाब ती काय किरकोळ पण च्यायला चिडीला पडल्यासारखं झालं सगळं. इगो प्रॉब्लेम झाला. माझा काहीच दोष नसतानाही मी माघार घ्यायला तयार झालो. तुला साल्या तुकडे करून गाडून टाकला पाहिजे असं म्हणाले ते. माझ्या बाजूनं कुणीच आले नाहीत. घाबरट साले. बरं लोकांना त्रास नकोय असंही म्हणता येत नाही. कधीकधी किती त्रास घेऊन मदत करतात. पण मला ही वेळ महत्त्वाची वाटत होती. पण त्यांनी काय विचार केला कोण जाणे. एरवी म्हणाल तर सगळे नॉर्मल मनांचे वाटतात. मी फारसं कुणाचं नुकसान करू शकत नाही हीच एक माझ्यात ॲब्नॉर्म्यालिटी आहे हे लक्षात यायला लागलंय माझ्या. त्यामुळं एखाद्याला वेळ पडल्यास प्रोटेक्ट करायची माझी कुवत आहे असं वाटतच नाही कुणाला. मग कशाला रिस्क घ्या असंही असेल. माझंही असंच आहे. नॉर्मलपणामुळं फार प्रॉब्लेम्स होतात.

पैसा असल्याशिवाय लोक किंमत देणार नाहीत हे मला माहीत आहे. नाहीतर मग एक चांगला चित्रकार तरी होता आलं पाहिजे. गायक, लेखक, अभिनेता -- काहीही चालतं. मला चित्रकलेची आवड होती म्हणून चित्रकार म्हटलं इतकंच.

पुष्कळ वेळा मला काहीच नको असतं. कितीतरी वस्तू जुन्या झाल्या आहेत. उपयोगातही नाहीत. काहींवर तर धूळ साठली आहे. सगळेच आपापल्या नादात आणि गडबडीत. धूळ झटकणार कोण ? इथंही मलाच माघार घ्यावीशी वाटतेय. आपणच झटकावी. घर स्वच्छ राहील. वातावरण बदलेल. सगळ्यांचंच आयुष्य सुधारेल. आणि आपल्या घरातल्या माणसांचं आयुष्य सुधारलं, ती शहाणी, उत्साही झाली तर आपल्यालाच सुख मिळेल हे मला कळतं. पण तरीही ते राहून जातं याचा अर्थच मला त्याचं महत्त्वच वाटत नसावं. ते सुख नाही तर नाही असं असावं. वेळही नसतो हेही आहेच. संध्याकाळी मी थकून येतो. आमचे साहेब म्हणतात की कितीही कामं असली तरी वेळ मिळाला नाही हे कारण सांगू नका. कारण ते खोटं असतं. त्यांच्यातच-- ते सगळं करता करताच-- हेही करायचं असतं. जिद्द आणि इच्छा पाहिजे. पण कधीकधी खरंच वेळ होत नाही. त्यांची मतं जरी वेगळी असली तरी त्यांनाही हे कळत असावं. तशी ॲक्शन वगैरे घेत नाहीत. अनुभवानं परिपक्व बुध्दीचा झालेला माणूस आहे तो.

तुम्ही मला हसाल पण खरंच कधीकधी आश्चर्य वाटतं मला. किती समजतं माणसाला. इतकं बारीक बारीक पुष्कळ कितीतरी. त्याशिवाय थोडंच जमणार आहे !

फक्त एकच कोडं सुटत नाही माझं. नॉर्मल जर नॉर्मल असेल तर त्याचा दुसऱ्यांना, एकमेकांना, स्वतःला त्रास नाही झाला पाहिजे. की जेवढा जास्त त्रास तेवढं जास्त नॉर्मल ? अजून कुणीही याचं उत्तर देऊ शकलेलं नाही.

*****

# अपहरण

ते आणि आपण. आपण आणि ते. त्यांनी असं केलं. पूर्वीही त्यांनी अशाच गोष्टी केलेल्या आहेत. हे सतत चालू आहे. त्यांच्या मनात आपल्याबद्दल द्वेष आहे. त्यांच्या धर्मगटात हा द्वेष जोरदार भडकावा असं त्यांना वाटतं. आपला धर्म असा नाही. द्वेष हा आपल्या धर्माचा पाया होऊच शकत नाही. ते मात्र धर्माला द्वेषाचं रूप देऊ शकतायत. हे पटतं कसं इतक्या लोकांना ? आपण मात्र सहनशील आहोत आणि क्षमाशील. पण आता मात्र मर्यादा ओलांडली जातेय. ही जणू काही आपल्या क्रोधाची परीक्षाच चाललीय. मुळात आपल्याला क्रोध आहे की नाही अशी तर त्यांना शंका येत नसेल ? की आपण घाबरट आहोत असं त्यांना वाटतंय ? घाबरट खरं तर ते आहेत. ते छुपे वार करतायत. खुल्या मैदानात युध्द केलं तर त्यांचे बारा वाजतात हे त्यांना माहीत आहे. अनेकदा असं त्यांनी आपल्याकडून त्यांचं नाक कापून घेतलेलं आहे. त्या सगळ्या अपमानामुळंच आता आपला सूड घ्यायचाय त्यांना. आपल्या क्रोधाची चव घ्यायला आतूर झालेयत ते. आता हीच वेळ आहे. सिध्द करत बसायचे प्रामाणिक मार्ग द्यायचे आता सोडून. युध्द ही काय प्रामाणिकपणानं करायची गोष्ट आहे ? आपल्यालाही आता तत्त्वंबित्त्वं सोडावी लागतील. कांगावा करून मारावी आता मुसंडी आणि करावी त्यांची वाताहात ! ते माजलेत, ढोंग करतायत. जणू ते यात नाहीतच ! पण आपल्याला सगळं माहीत आहे. दुसऱ्या एखाद्यानं बेभान होऊन पेटवलं असतं सगळं ! हा काय म्हणेल, तो काय म्हणेल, गेलं उडत ! पण आपण समंजस आणि सुसंस्कृत आहोत अशी आपली प्रतिमा आहे. ती मरू द्यायची ? म्हणजे एक प्रकारे आपल्याला मारण्यात यशस्वीच होणार ते ! आपणही द्वेष पसरवावा ? म्हणजे एक प्रकारे त्यांचाच विजय होणार तो ! पण आता हे बास झालं ! फार झालं ! त्यांना आता दीर्घकाळ लक्षात राहील असा धडा शिकवावा लागेल. नाहीतर हे वाढतच जाईल. आपण बुळचट ठरू ! आणि ते नामानिराळे ! ते वेडेही आहेत. फारच उद्‌ध्वस्त व्हायची वेळ आली तर आत्मघातकी सर्वनाशही करायला ते तयार होतील । या वेडेपणाला घाबरून कसं जगता येईल आपल्याला ?

' ते आणि आपण ' या तत्त्वाच्या प्रकारात आपल्या डोक्याचं तर अपहरण होत नाहीय ? हे अपहरण न होता योग्य ती कृती होऊ शकेल ?

( व्यक्त-अव्यक्त,फेब्रु.२००० )

*****

# आत्मदहन

आपलंच  कुणी असं त्राग्यानं पेटवून घेत असतं तर कसं प्राणपणानं धावाधावीचं दृश्य घडलं असतं, तसं दिसलं नाही. त्यानं अंगावर तेल ओतून पेटवून घेईपर्यंत सगळे नुसते बधत उभे राहिले. भारताचे पोलीस, नागरिक सगळे ! पेटवून घेतल्यावरही विझवण्यासाठी आकांतानं प्रयत्न झाल्याचं दिसलं नाही. जरा वेळानं एका पोलीसानं कांबळं आणून टाकलं, धूर झाला. ते काढलं, पुन्हा ज्वाळा दिसल्या. मग कुणीतरी बादलीभर पाणी आणून ओतलं. तोपर्यंत तो मेलेलाच असणार. प्रेत सायकलरिक्षावर टाकून नेलं. मागून एक दोन पोलीस पळत चाललेले दिसले.

ज्यानं पेटवून घेतलं त्याचा भाऊ आणि आई यांना एका स्कूटर चोरी प्रकरणाच्या संदर्भात पोलीस सारखा त्रास देत होते. विनाकारण त्रास देत होते. हे त्याचं गाऱ्हाणं होतं. कुणी काही लक्ष दिलं नाही. त्याची आई म्हणत होती की आपण कलेक्टरकडे जाऊ, इकडे जाऊ, तिकडे जाऊ. त्याचं म्हणणं हे सगळं झालेलं आहे. याचा काही उपयोग नाही. हे सगळे एकमेकांना सांभाळून घेणारे आहेत. म्हणून या सगळ्याचा एक शेवटचा निषेध म्हणून त्यानं हा मार्ग पत्करला. म्हणजे त्याच्यावर तर गुन्ह्याचा संशयही नव्हता. तरी त्याला असं भयानक मरू दिलं ! एक मानसशास्त्रज्ञ म्हणाले की असे टोकाला जाणारे काही लोक असतात. हो, पण  हे विश्लेषण फक्त त्या मुलासाठीच ? पोलीस कुठल्या टोकाला गेले आहेत ? नागरिक कुठल्या टोकाला गेले आहेत ? विश्लेषक म्हणाले की पुढारी, गुंड, पोलीस आणि मुलकी राज्ययंत्रणा हे एकमेकांना  ' मिळालेले ' म्हणजे ' मिले हुए ' आहेत. हे सगळ्यांना माहीत आहे. आपण मधे पडून उपयोग तर काहीच होणार नाही, पण उलट, बळी पडण्याचा धोका आहे हे सगळ्यांना समजतं म्हणाले.

बरं, हे सगळे एकमेकांना ' मिळालेले ' का झाले याचंही काही विश्लेषण असेलच ! आज आमच्यावर प्रसंग आहे उद्या तुमच्यावर येऊ शकतो, आपण एकमेकांना सांभाळून घ्यायलाच हवं. हा एक प्रकार असेल आणि आपापल्या सत्तेचा -- शक्तीचा माज आणि त्यातून फक्त आपापली सुखं ओरबाडत राहणं हेही असेल. आणखीही काही असेल. याच्याही मुळाशी एकटं पडण्याची, नाकारलं जाण्याची, सुखांना मुकण्याची भीतीच असेल.

म्हणजे सगळेच एकेक प्रकारे एकेकटे पडलेले आणि आतून घाबरलेले आहेत. यात एकटं न पडणारं असं ' निर्भय ' तत्त्व कुठंच नाही.  आपण हा एक देश म्हणतो, पण कुणाचा कुणाला विश्वास नाही. बाहेरही देशादेशांनाही एकमेकांचा विश्वास नाही. मानवी हक्कांचे कैवारीसुध्दा अनेकदा मूग गिळून बसतात किंवा स्वतःही अत्याचार करतात. जणू ' एकटं ' पडणं भागच आहे -- असंच सगळ्यांना अध्याहृतपणे मान्य आहे !

या सगळ्याच्या मुळाशी जर ' एकटं ' पडणं असेल तर त्याचं काय करता येईल ?

( व्यक्त-अव्यक्त,फेब्रुवारी २००० )

****

## टाळकं

"आपलं टाळकं फिरलं की आपल्याला भान राहात नाही. आपण काहीपण करतो !" असा आत्मशोध आणि आत्मबोध मान्य करणारेही खूप आहेत. ही एक प्रांजळ कबुली आहे की हा एक ' गर्व से कहो ' टाईप उन्मत्तपणा आहे हेही यात अस्पष्ट होऊन जातं. काहीजणांचं तर असं म्हणणंही असतं की आपली इमेज जरा तिरसट, संतापी टाईप ठेवावी म्हणजे आपल्या नादी लागताना लोकांना विचार करावा लागतो. घरात राग आला की एखादी वस्तू फेकून देणं, दार आपटणं असं काहीतरी करावं आणि बाहेर शे-पाचशे लोकांना राग आला की ताबडतोब वाहनं जाळायला सुरुवात करावी. शक्यतो बसेस जाळाव्या.

बसेस जाळायच्या झाल्या तर आतल्या प्रवाशांना उतरवून मग आगी लावाव्यात अशी पध्दत होती. आता संताप आवरतच नाहीय. ते प्रवासी खाली उतरेपर्यंत गरम झालेलं टाळकं वाट कशी पाहणार हो ? आणि आपल्याला राग आवरत नाही हे आपण सांगतोच आहोत ना ! आणि सात्विक संताप काय वाईट असतो का ? तुम्ही न्यायाचे मुडदे पाडताय, मूल्यांचा विध्वंस करताय म्हणून क्रुध्द झालोय ना आम्ही ! तर सारांश म्हणजे त्यांनी कुणाला काही कळायच्या आत प्रवाशांसह बस पेटवली. अचानक, धडाडून. बरेच प्रवासी धडपडत बाहेर पडले. काही चेंगरून, भाजून जख्मी झाले आणि तीन विद्यार्थिनी तर आतच राहिल्या आणि त्या आगीत भाजून मरण पावल्या ! काय झालं, कोण चिडलं, कशामुळे बस पेटवली गेली -- काही कळायचाही प्रश्न नव्हता. अन्यायाविरुध्द रोष प्रकट करण्याचं अभिव्यक्ती स्वातंत्र्य कोणीतरी वापरत होतं ! आणि संताप व्यक्त केला नाही तर अन्याय करणाऱ्यांवर वचक राहात नाही. मूल्यं पायदळी तुडवली जातात आणि जंगल कायदा सुरू होण्याचा धोका निर्माण होतो. अशा गोष्टींना ताबडतोब प्रतिकार करण्याची जागरूकता दाखवयलाच हवी ! समाज सगळं सहन करत बेशुध्दीत पडून राहिला तर देशात सगळीकडे नैतिक पातळीचा ऱ्हास होत जाईल. अन्यायग्रस्तांना कुणी वालीच उरणार नाही. असं होऊन कसं चालेल ?

हेच तत्त्वज्ञान थोड्याफार फरकानं प्रत्येकाच्याच तोंडी आहे. टोकाची विरोधी मतं असलेली माणसंही 'जागरूक'तेची भाषा मात्र एकच बोलताहेत. मूल्य, न्याय या शब्दांचे प्रत्येकाचे अर्थ वेगवेगळे आहेत. तरीही सगळी माणसं, हेच शब्द वापरताहेत. नैतिकता, सत्य यांचे सगळेच पाठीराखे आहेत. फक्त त्या शब्दांचे अर्थ प्रत्येकाला आपापल्या अपेक्षेप्रमाणे हवे आहेत.

व्यक्तीव्यक्तींमधल्या संबंधांत, समूहांमधल्या संबंधात आणि देशादेशांच्या संबंधांत हेच घडतं आहे. मूल्य, नीती,सत्य, न्याय या शब्दांचे अर्थ शोधून काढण्यासाठी एक जागतिक समिती नेमली तर कदाचित या शब्दांच्या सर्वमान्य अशा व्याख्याही तयार होतील. पण त्या व्याख्याच आधी बळी जातील. शब्द वळवले जातील. अर्थ वाकवले जातील.

असं जर आहे तर हे जग टिकलंय कसं काय ? हे टिकण्याच्या मुळाशी काहीतरी ' समज ' असेलच ! कोणतं असेल ते मूल्य ? की नाश करण्याच्या एकमेकांच्या कुवतीची भीती - या मूल्याच्या आधारावर तोललं जातंय सगळं ?

कृष्ण, बुध्द, कृष्णमूर्ती काही सांगून गेले.त्याचं काय करायचं ? जगाच्या असंख्य वाचनालयात सगळीकडे पडून आहेत त्यांचे शब्द. ते वाचणारेही काही ' निरुपयोगी ' लोक असतील. पण एकूणात सारांश काय आहे ?

एकमेकांच्या भीतीच्या आधारावर स्वातंत्र्य ? एकमेकांच्या हिंसेच्या आधारावर निर्भयता ? एकमेकांच्या व्देषाच्या आधारावर प्रेम ? मानवाची निर्मितीक्षमता निर्मितीक्षमता म्हणतात ती हीच की काय !

( व्यक्त-अव्यक्त, मार्च २००० )

*****

# येरा गाबाळाचे

जात या विषयावर आतापर्यंत लाखो लोकांनी लेखणी आणि जीभ झिजवली असेल. यावर आता अधिक काय बोलायचं शिल्लक असणार ? रक्ताचा रंग लालच असतो. सगळ्यांचे शरीरधर्म, सुखदुःखं सारखीच असतात -- हे तर आता सगळ्यांनाच पाठ असतं. आणि हे तर एकदमच खोलातलं आणि पूर्ण सत्यच झालं. पुढं आता काही बोलूच नका. असा एकूण प्रकार.

दि.८ मार्च २००० च्या 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये एक बातमी आहे-- "सर्वोच्च न्यायालयाने उपटले जातीत फसलेल्या शास्त्रज्ञाचे कान !" या प्रकारात एका पेशावर शास्त्रज्ञाचीच कोर्टाकडे अशी तक्रार होती की त्याच्या सासुरवाडीच्या लोकांनी त्याला त्यांच्या 'जाती ' बाबत खोटी माहिती देऊन त्यांच्या मुलीशी त्याचे लग्न लावून दिले आहे. वस्तुतः ते लोक खालच्या जातीचे आहेत. त्याच्यासारख्या सवर्णाने खरी माहिती असती तर या मुलीशी लग्न केले नसते. सदर सवर्ण शास्त्रज्ञ हैदराबादच्या डीएनए फिंगर प्रिंटिंग केंद्रात काम करतात.

न्यायालयानं निकालात असे म्हटले आहे की मानवी शरीरातील पेशीय आणि रेण्वीय रचनेत फरक नसतो आणि जातीव्यवस्थेला कोणताही शास्त्रीय आधार नाही. आता आपल्यासारख्या अ-तज्ञ लोकांना प्रश्न पडतो की आपला कायदा इथल्या भारतातल्या परिस्थितीवर आधारलेला आहे ना ? ' धर्मा ' ला तरी कुठे ' शास्त्रा 'त आधार आहे ? मग धर्मावर आधारित कायदे का आहेत ? आपल्या शासनव्यवस्थेला, न्यायव्यवस्थेला शास्त्रीय निकश हे पायाभूत म्हणून मान्य आहेत का ? की सध्या तसे नाही पण तशी प्रगती व्हावी म्हणूनच घटनेचा आढावा घेणे चालू आहे ? भारतातले असंख्य न्यायमूर्तीसुध्दा याबाबतीत स्वतःच्या वा स्वतःच्या मुलांच्या जीवनातले निर्णय कसे धेतात याचेही संशोधन उद्‌बोधक होईल काय ? न्यायमूर्तीच कशाला, पुढारी, शास्त्रज्ञ, डॉक्टर्स, इंजिनियर्स, कलावंत, अभिनेते वगैरे सगळेच ! म्हणजे एकूणच भारताचे नागरिक !

' पाहिजे जातीचे' असे म्हणणे हेच येरागाबाळाचे काम आहे असा हा निकाल आहे ! तमाम सगळे लोक चकित होऊन, मूर्च्छितसुध्दा व्हावे की काय या विचारात आहेत !

निकालाचा नव्हे तर आपल्या एकूणच मानसिक रचनेचा हा प्रश्न आहे. रक्त, मांस, पेशी, रेण्वीय रचना यांत नसेल हो फरक, पण मानसिक रचनेत आहे ना फरक ! या रचनेला तरी शास्त्रीय आधार आहे की नाही ? की फक्त सर्वांना समान गोष्टींचेच फक्त उल्लेख करत राहायचं ? बऱ्याचशा कायद्यांनाही परंपरांचे, रीतीरिवाजांचे, मनोव्यापारांचे आधार असतात असे ऐकून आहे. हे सगळे एकत्रितपणे कुणीतरी समजावून देण्याची गरज आहे.

तर या सगळ्या गोंधळाचे मर्म बिर्म काय ते सगळे मनोव्यापारात आहे -- हे अमान्य करण्यात काय अर्थ आहे ? मनोव्यापार ही गोष्ट एकदा मान्य केली की सगळ्यांचेच सगळे बरोबर ठरते ! नाही तर मग कोणते मनोव्यापार बरोबर -- कायदेशीर किंवा शास्त्रीय आधार असलेले ते तरी ठरवा !

मी क्रुध्द होतो आणि सूड घ्यायचे ठरवतो. या मनोव्यापाराला हिंदी चित्रपटसृष्टीचा आधार आहे. शास्त्राचाही आहे का ? असला तर सूड घेणे बेकायदेशीर कसे ? मला यश न मिळाल्याने मी निराश, दुःखी होतो म्हणजेच माझा म्हणजे एका भारतीय नागरिकाचा छळ करतो. हे कायदेशीर आहे ?

आचारविचार, रीतीरिवाज, धर्म,शास्त्र, माणुसकी, मनोव्यापार आणि काळानुरूप बदलणाऱ्या निरनिराळ्या कल्पना आणि श्रध्दा. अंधश्रध्दा, इत्यादी सगळंच लक्षात घेऊन कायदा तयार होणार. त्यात काही तक्रार नाही. या सगळ्यांचं प्रमाणही सारखं ठराविकच राहील असं काही नाही. आणि निरनिराळे न्यायमूर्ती यातल्या निरनिराळ्या भागावर भर देऊ शकतील. या बद्दल तरी काय तक्रार असणार आहे ? याचाच अर्थ या तत्त्वांची एकमेकांशी टक्कर होऊ शकते. नेहमीच ती एकमेकांना पूरकच असतील असे नाही -- हेही आपल्याला मान्य आहे !

तर निकाल बरोबरच असेल ! पण एकूण हे सगळं लक्षात घेता, एखाद्या देशाचा कायदा जाऊन जाऊन किती खोलात जाईल ? म्हणजेच अधिकाधिक खोलात नेता येईल असा एक आपला आपल्या जगण्याचा स्वतंत्र कायदा हवा की काय ? असा कायदा की जो एकमेकांशी टक्कर होणाऱ्या तत्त्वांवर आधारलेला नसेल ? त्यातच कदाचित काहीतरी निर्विवाद स्वच्छ असं काही सापडेल ? या सगळ्याचा आणि आपलाही शेवट आपल्याला सापडेल ? नुसतंच निरनिराळ्या बाजू लढवता येतील अशा कायद्याचा कुठवर उपयोग होईल ? आपण स्वतःच्या अंगानंही फारसं खोलात जात नाही हाच खरा प्रश्न असावा. म्हणूनच मग निकाल पटतोय की पटत नाहीय ? करा विचार !......

( व्यक्त-अव्यक्त, एप्रिल २००० )

*****

## तडफ

पंतप्रधान स्त्री असून ती स्वतः गर्भवती असणं किंवा पंतप्रधान पुरुष असून त्याची पत्नी गर्भवती असणं-असल्या गोष्टी आपल्या कल्पनेतही येत नाहीत कारण अशा प्रकारचा तडफदारपणा पूर्णपणे लोप पावल्याशिवाय या पदासाठी एखादी व्यक्ती इथे लायकच धरली जात नाही. पण इंग्लंडमध्ये जरा वेगळा प्रकार आहे. तिथल्या पंतप्रधानांची पत्नी गर्भवती असून बाळंतपणाच्या काळात तिच्या पतीनं म्हणजे खुद्द पंतप्रधानांनी रजा घेऊन घरी थांबावं असा लकडा तिनं आत्तापासूनच लावलेला आहे. आपण म्हणू की हे तिला शोभून दिसत नाही. ती काय एखाद्या कारकुनाची किंवा कामगाराची बायको थोडीच आहे ? राजाच्या राणीनं आपल्या इतमामानं वागायला हवं ! आणि तिला प्रॉब्लेम काय असणार आहे ? प्रत्येक कामाला नोकरचाकर वगैरे असणारच दिमतीला ! मस्त आपलं ' तिसरा डोळा ' बघत पडून राह्यचं !

त्यातही तिची आणखी एक कंडिशन आहे. रजा घेतली तरी आपलं फोनवरनं आणि मोबाइलवरनं कामं चालूच -- असं नको ! रजा म्हणजे पूर्णपणे ' घरी ' असं हवंय तिला ! कारण मागं कधी एकदा ते पिकनिकला गेले होते तर पंतप्रधानांचे आपले मोबाईलवर सतत फोनच चालू ! ती अगदी वैतागून गेली होती तेव्हा ! याच्यावर आता कुणीही झालं तरी काय म्हणणार -- पंतप्रधानाची बायको असणं म्हणजे हे सगळं आलंच बाई त्यात ! मोठेपणाचे काही फायदे घेतेस ना, मग त्यांची किंमतही मोज !

आपल्याकडं सुध्दा एकत्र कुटुंबपध्दती नामशेष झाल्यापासून काहीजणांची अशी मागणी आहे की पुरुषांनाही मॅटर्निटी लीव्ह म्हणजे बाळंतपणाची रजा मिळावी. स्त्रीच्या निम्मी का असेना पण मिळावी. थोडे दिवस तरी काही काम करणं, मदत करणं -- काही बघायला नको ? एकूण काळाचा विचार करता ही मागणी अयोग्य कशी म्हणता येईल ? साध्या माणुसकीच्या विचारांनाही खूप वेळ लावायची पध्दत वापरून का असेना पुढंमागं ही मागणी मान्य होईलच ! मग एखादा पुरुषही असं म्हणताना दिसेल की - " ते ठीक आहे पण सोमवारपासून मी मॅटर्निटी लीव्हवर आहे !" काही काळानंतर मग याचं कुणाला काही विशेष वाटणारही नाही ! अर्थात पुढं असंही होईल की प्रमोशनच्या वेळी वगैरे प्रत्येकाचं रजेचं रेकॉर्डही पाहिलं जाईल ! कामाचं महत्त्व न मानता नुसत्या स्वतःच्या रजा संपवण्याच्या मागं असलेल्या माणसाला प्रमोशन देऊन काय उपयोग ? असाही चाप बसवला जाईल !

कारखानदार, दुकानदार, व्यावसायिक, महत्त्वाच्या पदांवर असलेले आणि त्याहून अधिक महत्त्वाच्या पदांवर जाऊ इच्छिणारे किंवा निदान आहे ते पद टिकवू इच्छिणारे आणि एकूणच आपला सामाजिक दर्जा आणि आर्थिक परिस्थिती अधिकाधिक सुधारू इच्छिणारे सगळेच-- यांची एकूणात काय परिस्थिती आहे ? क्षणभर विश्रांती घेणं किंवा क्षणभर एखाद्या पक्ष्याचा आवाज ऐकणं - हासुध्दा गुन्हा वाटावा अशीच एकूण मनःस्थिती आहे ! महत्त्वाकांक्षांचे ताण एक क्षणभरही सोडून दिले तरी आपण खूप मागे पडू अशी सतत भीती आहे. जपानमधले एक्झेक्युटीव्ह म्हणे इतकं प्रचंड काम इतक्या तडफेनं करतात की त्याचे सगळे ताण आणि साधं -- नॉर्मल जगण्याचा अभाव यांमुळे ते तरुणपणीच मृत्यू पावतात ! म्हटलं तर थोड्याफार फरकानं आपणही तोच मार्ग पत्करतोय असं दिसतंय !

दुसऱ्यांच्या जीवनावर परिणाम करता येणं, नोकऱ्या लावून देणं, कुणाचं भलं करता येणं, आपल्या नादी लागणाऱ्याचं नुकसानही करता येणं - ही एकूणात मोठं आणि महत्त्वपूर्ण असण्याची लक्षणं आहेत. मोठा माणूस म्हणजे तो मेल्यावरसुध्दा नंतर पुढं कित्येक वर्षं असंख्य लोक असं म्हणत राहिले पाहिजेत की त्यांनी आमचं भलं केलं किंवा त्यांनी आमचं नुकसान केलं !

कलावंत, शास्त्रज्ञ -- अशीही काही क्षेत्रं जरा महत्त्वपूर्ण जगण्यासाठी उपयोगी दिसतात. पण तसे समाजात हे लोक फारसे पॉवरफुल समजले जात नाहीत. जिद्द आणि आत्मविश्वास यांच्यापेक्षा तिथं धीर आणि यशाची अनिश्चितता स्वीकारणं -- हे जास्त महत्त्वाचं असतं ! जाऊ दे ! वेळ वाया घालवायला नको !

बरं, या एकूण जगण्याला विकृत म्हणून तरी काय उपयोग आहे ! विकृत नसलेलं असं जगणं तर कुठं कल्पनेच्या क्षेत्रातही नाही ! मग त्यात कशाला वेळ वाया घालवायचा ?आहे हेच अधिकाधिक तीव्रपणानं आणि तडफेनं जगावं हे उत्तम ! आणि हेच लाईफ असतं यार !

( व्यक्त-अव्यक्त, मे २००० )

*****

# सद्‌गुण आणि ग्लॅमर

सरावाने आलेली सहजता, बिनचूकपणा, क्षणार्धात निर्णय घेऊन प्रतिक्रिया देण्याची कुवत, चपळता, शारीरिक कष्टाची क्षमता, सावधपणा, निर्वाणीच्या क्षणीही शांत राहू शकणारं डोकं आणि याबरोबरच चांगलं दिसणं, बोलणं, वागणं आणि दुसऱ्याच्या मदतीसाठी तत्पर असणं, दुसऱ्याच्या सुखदुःखांची जाणीव असणं, कुणालाही क्षुद्र न लेखणं, स्वतः यशानं शेफारून न जाणं - हे असं जर असेल तर एका शब्दात म्हणजे " हीरो " च तो ! शिवाय गाणी म्हणणं, विमानं चालवणं -- हेही येत असेल तर उत्तमच !

हिंदी पिक्चरचे हीरोच असं नाही, खेळातही वरीलपैकी बरीचशी वैशिष्ट्यं आवश्यक असतातच. यश असं उगीचच आणि सहजासहजी मिळत नाही. मेहनत, लगन आणि जिद्द यांचं ते फळ असतं. चित्रपट आणि खेळ यातलं यश तरी असंच असतं.

इतर क्षेत्रांचं काय ! कलेक्टर, व्यापारी, कारखानदार, शेतकरी, कामगार, अकौंटंट, शास्त्रज्ञ, सफाई कर्मचारी -- यांचं काय ? आपापलं काम उत्तम तऱ्हेनं करण्यासाठी यांना नाही लागत वरीलपैकी बरेचसे गुण ? वाल्श, कपिल, सचिन यांना या गुणांची जेवढी आवश्यकता आहे तितकीच ती इतर क्षेत्रांतही नाही का ? हृतिक रोशनकडे हे गुण आहेत आणि एखाद्या ग्रामसेवकामध्ये ते नाहीत असं असतं का ? की कुठल्याही क्षेत्रात आपापल्या कामात एक उंची गाठण्यासाठी, त्या कामात उत्तमता आणण्यासाठी हे गुण आवश्यकच असतात ?

सचिनचा खेळ बघून किंवा एव्हरेस्ट शिखर सर होत असल्याचं पाहून लोकांची चेतना जागृत होत राहणं, आपणही आपले काम शक्य तितक्या पूर्णत्वभक्तीनं करावं असं वाटणं शक्य आहे. हे चांगलंही आहे. दर्जा, कार्यतत्परता यांना मानवी जीवनात महत्त्वाचं स्थान आहेच. हे अर्थातच कुठल्याही क्षेत्रातलं उत्तुंग काम पाहून होऊ शकेल, होतही असणारच.

इथपर्यंत सगळं ठीक आहे. यात काही प्रश्न नाही. प्रश्न हा आहे की कोणत्याही क्षेत्रात उत्तुंगता गाठण्यासाठी लागणारे गुण जर तेच आहेत तर फक्त चित्रपट आणि खेळ याच क्षेत्रांतल्या यशाचं वेगळं महत्त्व काय आहे ? काल आलेला एखादा नट आज लगेच करोडोंची जाहिरात करत पुढे येतो. एखाद्या यशस्वी खेळाडूला जाहिरातीत घेतल्यामुळे करोडोंनी खप वाढतो -- हे कसं ? सद्‌गुण, चिकाटी, प्रतिभा तर इतरत्रही लागतात. विक्रमी पीक घेणाऱ्या शेतकऱ्याला घेऊन थंडपेयाची जाहिरात का होत नाही ? तो एखाद्या खेळाडूपेक्षा किंवा सिनेनटापेक्षा कमी महत्त्वाचा किंवा कमी गुणी असतो का ? की तो लोकांना फारसा माहीत नसतो म्हणून असं होतं ? म्हणजे निव्वळ यशाला महत्त्व नसतं का ? यशापेक्षा ते लोकांना माहीत असणं हे अधिक महत्त्वाचं असतं का ? कोणतं यश लोकांना माहीत असतं आणि ग्लॅमरस होतं ?

याचं उत्तर अवघड नाही. जरा विचार केला की ते लक्षात येणारं आहे. सद्‌गुण सगळे तेच लागतात हो, पण जे काम लोकांमध्ये उत्तेजना आणतं, नशा देतं, सनसनाटीपणा तयार करतं, त्यांच्या रोजच्या कटकटींपेक्षा वेगळ्या गोष्टींत त्यांना व्यग्र करून बांधून ठेवतं, त्याच प्रकारच्या कामाला ग्लॅमर प्राप्त होतं. तितक्याच योग्यतेचे लोकही मग या ग्लॅमरवाल्यांच्या दर्शनात धन्यता मानू लागतात. इतरांची म्हणजे आपापल्या कामातही आळशी असणाऱ्यांची तर बातच सोडा. अशा प्रकारे व्यग्र होण्यामधे वाईट काय आहे ?-- असाही प्रश्न इथे उद्‌भवतो. ' कधीतरी 'असं होणं वाईट नाहीही. किंबहुना ते आवश्यकही असू शकेल. पण नेहमीच वास्तवापासून पळ काढावासा वाटणं, भीती वाटणं, त्रास वाटणं आणि म्हणून नेहमीच अशी 'पळपुटी 'अवस्था असणं - याला चांगलं म्हणता येईल ?

ज्या क्षेत्राला, माणसांची ' नशेची आवड ' या कमकुवतपणाचा पाया लाभतो, त्याच क्षेत्रात ' ग्लॅमर ' ची निर्मिती होते. याचाच अर्थ ग्लॅमर ही माणसाच्या विकृतीच्या -- रोगाच्या जमिनीत फोफावणारी वल्ली आहे. अशाच क्षेत्रात करोडोंची उलाढाल, फसवाफसवी, गुन्हेगारी यांनाही प्रचंड वाव मिळणार यात शंका ती कसली ? सामना निश्चितीनं चकित का व्हावं ? एखाद्या फुटबॉल मॅचमध्ये प्रेक्षकांनी घुसून हाणामारी केली तर यात अनपेक्षित काय आहे ? अशा क्षेत्रांवर आधारित सट्टाबाजार चालणं हे तर ' अधिकस्य अधिकम फलम् ' म्हणावं लागेल. मुख्य म्हणजे जिथं सनसनाटीपणा, नशा यांचं महत्त्व आहे तिथं आग्रह, हिंसा, स्वार्थ, क्रौर्य येणारच.

मॅचफिक्सिंग बंद करायला बाहेरचे नियम कितपत उपयोगी पडतील ? ' फिक्सिंग कर नाही तर उडवून लावू ' - अशा खेळाडूंना धमक्याही येतील. हे होत राहील. पण मुख्य म्हणजे ' ग्लॅमर ' ची निर्मिती करणाऱ्या माझ्या स्वतःच्या मनाच्या रोगटपणाकडे मी कधी पाहणार ?

( व्यक्त-अव्यक्त जून २००० )

*****

# नंतरची शिस्त

पुणे शहराच्या बऱ्याच मोठ्या भागात अलिकडेच स्फोटांचे तीन आवाज ऐकू आले. एकूण परिसरही हादरल्यासारखा वाटला. काय झाले ते लोकांना कळेना. त्यांनी वर्तमानपत्रे, फायरब्रिगेड इत्यादी ठिकाणी फोन करून विचारणा सुरू केली. कुठेही, काहीच पत्ता लागला नाही. कुठे पडझड नाही, वित्तहानी किंवा मनुष्यहानी नाही, यांच्याशी संबंधित अशी कुणाची कुठे तक्रारही नाही. तीन दिवस अशी चौकशी चालली. तरीही एकूणात काहीही कळले नाही -- अशीच बातमी छापून आली. कुणी म्हणाले, त्या दिवशी आकाशात ढग होते,त्यांचा तर गडगडाट झाला नसेल ? ही शंकाही विचारांती निकालात निघाली. भूकंपाच्या शंकेचेही तसेच झाले. पुढेमागे कुणीतरी या स्फोटांची जबाबदारी स्वीकारेल हीही आशा मावळली. कारण कुठे कसली हानीच झालेली नाही तर जबाबदारी स्वीकारण्यात तरी अभिमान कसला ?

पूर्वीही एकदा असे झाले होते आणि त्याचेही गूढ अनुकलितच राहिले असेही कळले. ही काय भानगड ? की नियतीच मधूनमधून आपली चेष्टा करतेय ? वैज्ञानिक विचाराप्रमाणे काहीच न घडता स्फोट होऊ शकणार नाहीत. भास, भ्रम म्हणावेत तर हे आवाज पुण्यातल्या हजारो-लाखो लोकांनी ऐकले ! सगळेच भ्रमिष्ट असतील ? आता इतर कामांच्या ओघात आणि व्यापात हा विषय तर आता सोडूनच द्यावा लागणार आहे पण हे एक गूढ आपल्या स्मृतिपटलावर आता कायमचे कोरलेच गेले, नाही का ? अगदीच मोकळे असलो तर हे आपल्याला आठवणारच !

एवढ्या प्रगत जगात हे असे कसे घडू शकते ? कुठल्याही परिस्थितीत, लागल्यास आणखी कुठल्या तज्ज्ञांची मदत घेऊन या स्फोटांचे कारण शोधून काढायलाच हवे -- असे हे महत्त्वाचे नाही ? निदान शैक्षणिक चिकित्सेचा तरी या विषयाकडे रोख कळायला नको ?

असे विचार चालू असतानाच एक अनुभवी आणि परिपक्व बुध्दीचे सज्जन समोर आले. त्यांचे म्हणणे असे की हे सगळे विचार चुकीचे आहेत. कारण स्फोट घडले हे तर सत्यच आहे. याचा अर्थच असा की कुठेतरी कुणाच्या तरी चुकीमुळे अशी काही घटना घडली असावी आणि त्या प्रकाराची दडपादडपी झाली असावी. किंवा राष्ट्रीय गोपनीयतेचा काही भंग होण्याची शक्यता असल्याने,याचा शोध घेतल्यासारखे करून सोडून दिले असावे. फार फार तर काय होईल ? काही दिवस लोकांना जरा वेड्यासारखे वाटेल इतकेच ! पण लोक शहाणे असतात ! विसरतील !-- हे जरा पटण्यासारखे वाटले.

ही बुध्दिमत्ताही वैज्ञानिक दृष्टीकोणावर आधारित अशीच होती. एकूणात या विश्वाला त्याची स्वतःची अशी एक शिस्त आहे-- हे निरीक्षण याच्या मुळाशी होते. निसर्गचक्र, जीवनमरण, झाडे, फुले, प्राणी, पक्षी, हवा, पाणी - या सगळ्यांत एक शिस्त आहे. सगळे नियमबध्द आहे. तसे नसते तर विज्ञानाचाही प्रश्न आला नसता. झाडावरून तुटलेले सफरचंद एकदा खाली पडतेय आणि एकदा वर पळतेय असे होऊन कसे चालेल ? म्हणजे विनाकारणच आवाजाची निर्मिती होणे, सहज आपली अचानक प्रकाशाची निर्मिती होणे -- असे तर काही घडणार नाही. पण परमार्थमार्गात असे काही अनुभव येतात असे म्हणतात । पुण्यातले इतके लोक परमार्थ मार्गात असतील ? आणि जरी असले तरी अशा गोष्टींना एक प्रकारची मधुरता, आल्हादकारकता राहिली असती !असे दचकवणे कसे त्यात येईल? अनाहत नाद ठीक आहेत पण अनाहत स्फोट ?

त्याच्यातही एक भानगड अशीही आहे की हे विश्वच मुळात एका स्फोटातूनच निर्माण झालेले आहे म्हणतात ! मग ' तो ' स्फोट कशाचा, का झाला ? -- हे सांगता आले तर या ना त्या रूपात हे विश्व आधीच अस्तित्वात होते असे म्हटल्यासारखे होते ! काही वर्षांपूर्वी 'टाईम्स ऑफ इंडिया'त एक लेख वाचला होता. त्याचे शीर्षक होते - 'मॅटर क्रिएटेड आऊट ऑफ नथिंगनेस !' म्हणजे काहीच नसण्यातून वस्तुमात्राची निर्मिती ! -- हे वैज्ञानिक आहे ? विश्व तयार झाल्यानंतर सफरचंद खाली पडते, पण आधीचे काय ? कशासाठी तयार झालाय हा उपद्व्याप ? संत तुकाराम म्हणतात --

कोण्या कारणे हे जालेंसें निर्माण ।
देवाचे कारण देव जाणे ।।

मूळ स्फोटात तर गोपनीयतेचा प्रश्न नव्हता ! तरी हीच अवस्था ! नंतर मात्र सगळी शिस्त ! आणि नंतरसुध्दा सगळे जर शिस्तबध्द आहे तर मग माणसाच्या मनाची अशी का बोंब झालीय ? असे व्हावे हेही या शिस्तीतलेच असेल ? मग कसली हो ही भंगार शिस्त ! की या शिस्तीतलेही हे एक गूढ म्हणायचे ?

( व्यक्त-अव्यक्त, जुलै-ऑगस्ट २०००)

*****

# विषाणू की विचार

पुण्यातल्या दोन मुलींनी मुंबईत एका टीव्ही चॅनेलच्या कॅमेऱ्यासमोर काही रक्कमेच्या बदल्यात रस्त्यावर स्वतःच्या अंगावरचे कपडे उतरवण्याचं धैर्य दाखवलं ! टीव्हीवरूनच एक मुलगी म्हणते की कुणाबरोबर, कुठं, किती काळ राहायचं हे तिचं तीच ठरवणार. त्यासाठीही लग्नच केलं पाहिजे असंही नाही. एखादा पुरुष जर एखाद्या सुंदर, मठ्ठ बाईला पत्नी म्हणून मिरवतो तर एखाद्या बाईनं एखाद्या सुंदर, मठ्ठ पुरुषाला पती म्हणून का मिरवू नये -- हेही वाक्य एक अभिनेत्री टीव्हीवरूनच म्हणते आहे. कॉम्प्युटरवर गप्पा मारून लग्नं होताहेत. डेटिंगही हळूहळू मान्यता पावत चाललं आहे. मुलींच्या अमुक प्रकारच्या कपड्यांनी मुलांच्या भावना चाळवतात तर मुलांच्याही तमुक प्रकारच्या कपड्यांनी मुलींच्याही भावना चाळवतात असं एक मुलगी टीव्हीवरून सांगते आहे. वैचारिक आव्हानं असलेली आणि अनेक प्रकारचे ताणतणव असलेली कामं पुरुषांप्रमाणेच स्त्रियाही करताहेत त्यामुळं सिगरेट, दारू या गोष्टी त्यांनाही आवश्यक आहेत -- असाही विचार मान्य होतो आहे. या पार्श्वभूमीवर पाकिस्तानच्या वायव्य सरहद्द प्रांतात केबल दूरचित्रवाणी वाहिन्यांवर, अश्लील कार्यक्रम दाखवले जातात म्हणून बंदी आणलेली आहे. या सगळ्यांबरोबर एक बातमी अशीही आहे की, ब्रिटीश कौन्सिलच्या पश्चिम भारत विभागाचे संचालक पॉल स्मिथ यांच्या मते पश्चिमात्यांवर पौर्वात्य संस्कृतीचा, त्यातही भारतीय संस्कृतीचा प्रभाव वाढतो आहे.

या सगळ्या प्रकारात थ्रिल, पुरोगामीपणा, प्रतिगामीपणा, आधुनिक जीवनशैली, बेधडकपणा, काहीही करून पुढं जाणं, कमीत कमी वेळात श्रीमंत होणं, सर्व तऱ्हांचे सुखोपभोग सगळ्यांनाच हवेसे वाटणं -- असे सगळे प्रश्न आहेत. कुणीही काहीही बोललं तरी त्याला कमी जास्त प्रमाणात प्रत्युत्तर ठरेल असंही काही बोललं जाऊ शकतंच. त्यामुळं सगळेच एकमेकांवर आपापल्या मतांच्या -- धारणांच्या रक्षणासाठी हेटाळणीचे शब्द फेकत राहू शकतात. निर्विवाद बरोबर असं यातनं काही निघू शकत नाही. कुणाला धक्के बसणं, कुणाला उत्साह वाटणं, कुणी संतापणं, कुणी संतापणाऱ्यावर संतापपणं -- हे चालू राहतं. कुणी कुणाला काही सांगण्यात, शिकवण्यात काही तथ्य नाही -- हे ज्ञान सगळ्यांनाच होत राहतं. उद्‌गारवाचकांचा आणि उद्‌गारचिन्हांचा खूप मोठ्या प्रमाणावर वापर होत असतानाच अशा अभिव्यक्तीला काहीच अर्थ नाही-- हेही त्याच वेळी घडत राहतं. आपले ते विचार आणि दुसऱ्याचे ते विषाणू हेच यातलं सार असतं.

संगणकात येणाऱ्या ' व्हायरस ' ला प्रतिशब्द म्हणून ' विषाणू ' या शब्दाचा वापर होत आहे. दुसऱ्याच्या विचारांना विषाणू का म्हणायचं तर ते विचार व्यक्तीचं आणि समाजाचं जगणं करप्ट करणारे आहेत -- सडवणारे, नासवणारे आहेत असं स्पष्ट दिसतं म्हणून. संगणकात घुसलेले काही ठराविक रचनाकण -- म्हणजे विषाणू -- जसे संगणकाचं कार्य खरोखर नष्ट करताना दिसतात त्याच पध्दतीनं अमुक एका विचारांचं कार्य चाललं आहे असं आपल्याला दाखवता येईल का ? म्हणजे कुणीतरी असा एक विचार घडवतं की तो एका मनातून दुसऱ्या मनात आणि अनेक मनांतून अनेक मनांत प्रवास करतो आणि ही सगळी मनं तो ' करप्ट ' करतो -- त्यांचं विघटन करत जातो -- असं ? मनाच्या विघटनाला तर कुणी चांगलं, आरोग्यपूर्ण तर म्हणणार नाही ! सॉरी ! म्हणणारच नाही असंही नाही -- हे लगेचच लक्षात येतंय ! हाच तर प्रामाणिकपणा हो ! आणि हो, या प्रकारात, असा विचार घडवणारी व्यक्ती स्वतः त्या विचारापासून मुक्त असण्याची शक्यता खूप कमी -- हे एक जरा वेगळं, मजेशीर हं ! मनाचं विघटन झालं की आयुष्याचं विघटन व्हायला कितीसा वेळ लागणार हो ? एकच ते !

म्हणजे आता विघटन होत नसलेली -- ' नॉर्मल ' कार्य चालू असलेली मनं सापडली की लगेच आपल्याला नीट काहीतरी बोलता येईल. विचार कुठले आणि विषाणू कुठले ते सांगता येईल ! पण मनं तपासणार कशी ? सरळ आहे-- असमाधानी, दुःखी, चिडचिडलेली, हपापलेली, गर्विष्ठ, अन्यायग्रस्त, तणावग्रस्त, भयग्रस्त असलेली, एकाकी असलेली थोडक्यात म्हणजे ॲब्नॉर्मल अवस्थेत असणारी मनं म्हणजे करप्ट होणारी मनं ! मग यात सगळीच मनं येतील की काय हो ?।

म्हणजे अमुक एक विचार हा विषाणू नसेलच बहुतेक ! आयला, मग मनाची एकूण हार्डडिस्कच विषाणू झालीय का काय ? मग तर हा कॉम्प्यूटर निकामीच म्हणायला लागेल । बापरे । आता दुरुस्त कशानं होणार हे ?

( व्यक्त-अव्यक्त, सप्टेंबर २००० )

*****

# नॉर्मल माणूस

' ये रहा आपका प्रश्न ' असं अमिताभनं म्हणणं यात करमणूक आहे पण आपल्या जगण्यात जेव्हा एखादा प्रश्न येतो आणि ' ये रहा आपका प्रश्न ' असं लक्षात येतं तेव्हा ती बारा वाजायची किंवा चिंध्या व्हायची वेळ असते. आधुनिक जगण्यात स्वतःला ओळखणं म्हणजे स्वतःचा प्रश्न ओळखणं आणि त्या प्रश्नाबरोबर वर्षानुवर्षं बोंबलत फिरणं. यात उद्‌गारचिन्हं कुठं वापरायची हो ? ते आश्चर्यही संपलेलं आहे. आता नुसतं वास्तवाचं वर्णन.

ई-मेल नंबर्स असणाऱ्या लोकांना तर आधुनिकच म्हणावं लागेल. ते आणि त्यांच्या आजूबाजूचे. अशा बऱ्याच जणांना एका व्यक्तिगत सल्लामसलत केंद्राकडून ई-मेल्स आलेले आहेत -- त्यांच्याकडे कोणकोणत्या प्रश्नांवर सल्लासमलत कौन्सेलिंगचा सगळा अर्थ येईल असा मराठी शब्द कोणता ?-- समुपदेशन ?) मिळेल याची माहिती देणारे. करोडपती माणसाला सर्वार्थानं भिकारी बनवू शकणाऱ्या यातल्या प्रश्नांची यादी अशी आहे :-विवाहसमस्या, व्यवसायातले अपयश, घरातल्या मुलामुलींबाबतचे प्रश्न, निराशा आणि वैफल्य, मादक द्रव्यांची व्यसनं, दारूचं व्यसन, तब्बेतीचे प्रश्न, नातेसंबंधांच्या समस्या, मालमत्ता-वाद, न्यायालयीन वाद, करिअरविषयक प्रश्न, गोंधळाची अवस्था आणि त्यामुळं निर्णय घेण्याची क्षमता नसणं, प्रेमभंग, अपयशाची भीती, आत्मविश्वासाचा अभाव, सरकारी ऑफीसेसमधली कामं, भागीदारीतले संघर्ष, परीक्षेतले अपयश, विवाहबाह्य संबंधांबाबतचे प्रश्न, मनाचं कोलमडणं, निद्रानाश, आर्थिक प्रश्न, इत्यादी.

हे सगळे विषय असे आहेत की यांत देवच फक्त मदत करू शकेल असा बऱ्याच जणांचा समज असणं शक्य आहे. किंवा मग मंत्रतंत्र, करणी, अंगारेधुपारे, निरनिराळ्या ग्रहांचे खडे वगैरे. कुणी म्हणतील की हे तर मग अंधश्रध्देचे मार्ग झाले. पण मग याच्यावर सरळ, बौध्दिक, वैज्ञानिक दृष्टिकोणाचे व्यावहारीक असे मार्ग कुठायत ? ' अपयशाची भीती या प्रश्नावर काय करायचं ?

एकदोन मानसोपचारतज्ञ, एकदोन वकील, काही डॉक्टर्स, चार्टर्ड अकौंटंटस्, सामाजिक कार्यकर्ते, असे काही लोक जर एकत्र आले आणि एका ठिकाणी उपलब्ध झाले तर एकूणच आधुनिक जगण्यातल्या प्रश्नांबाबत एक प्रकारचा 'एकात्म ' दृष्टिकोण शक्य होईल -- अशी या ई--मेल्स पाठवणाऱ्या केंद्राची कल्पना असावी. म्हणजे असं की घटस्फोटाची कायदेशीर बाजू पाह्यला वकीलही आहे, त्यानं येणारी उव्दिग्नता पाह्यला मानसोपचारतज्ञही आहे आणि या प्रकारात एकूणच तब्बेत बिघडली तर डॉक्टरही आहे. वन विंडो सिस्टिम. पण आपल्या ' शहाण्या ', आधुनिक मनाला हेही चालणार नाही. कारण प्रश्नांच्या या अंगासाठी अ, त्या अंगासाठी ब आणि तिसऱ्या अंगासाठी क हे खरे नावाजलेले आहेत -- ते तर इथं उपलब्ध नाहीत -- असं होणार. शिवाय आपले नेहमीचे डॉक्टर आजारी असल्यामुळं त्यांचा दवाखाना जर बंद असला तर दुसऱ्या डॉक्टरांवर एकदम विश्वास टाकणं जरा जडच नाही का जात ?

आणि मुळात यांनी जे लोक ही कामं हाताळायला नेमलेले असतील त्यांची कुवत काय ? त्यांना आहे आत्मविश्वास ? ते स्वतः आपयशाच्या भीतीतून मुक्त आहेत ? त्यांना नातेसंबंधांचे, मालमत्तेचे प्रश्न नाहीत ? की तेही या सगळ्या प्रश्नांतून जातच आहेत, पण प्रश्नाच्या एखाद्या एखाद्या अंगाबद्दल त्यांनी विशेष प्रावीण्य संपादन केलं आहे म्हणून ते सक्षम आहेत ?

परिस्थिती भयानकच आहे. त्यांनी दिलेल्या यादीतला एकेक प्रश्न म्हणजे --शरीराला नव्हे तर एकूण जगण्यालाच होणाऱ्या -- कॅन्सरचा एकेक प्रकार आहे. बरं, हे प्रश्न सोडवले जाणार म्हणजे तरी नेमकं काय होणार ? माणूस प्रश्नहीन होईल ? आनंदी होईल ? अणि प्रश्नांना काही शिस्तबिस्त नसते हो -- ते एका वेळी अनेक आणि पहिले सुटायच्या आधी दुसरे असेही येतात -- त्यांचं काय ?

दुसरं म्हणजे असंही एक शेवटचं पाहावं लागेल की -- करीअरचे प्रश्न सुटलेला, नातेसंबंधाचे प्रश्न नसलेला, अपयशाची भीती नसलेला, वैफल्यापासून मुक्त, आर्थिक प्रश्न नसलेला-- वगैरे वगैरे असा ' नॉर्मल ' माणूस असू शकतो ? की उघड्याकडे नागडं गेलं आणि थंडीनं कुडकुडून मेलं -- हेच करायचं असतं ?

' नॉर्मल 'होण्याची आपली धडपड म्हणजे कसली धडपड आहे - याचा शोध आपला आपणही घेत राहावं काय ? की काही गरज नाही ? ! बघू !

( व्यक्त-अव्यक्त,ऑक्टोबर २००० )

*****

पत्ता :-- चं.प्र.देशपांडे, ३, स्नेहदीप अपा., चिंतामणीनगर, सावरकर पथ, सहकारनगर नं.२,पर्वती,
पुणे -- ४११००९. ( दूरध्वनी -- ४२२ ७८४७.)